# भावनांचे खेळ

## व इतर गोष्टी

लेखिका

श्री. सौ. आनंदीबाई शिर्के.



प्रथमावृत्ति-प्रती १०००

इ. स. १९४३.

किंमत २॥ रुपये.

# श्री. सौ. आनंदीबाई शिर्के यांचें लेखन.

## प्रकाशित.

१ कथाकुंज ( लघुकथासंग्रह )

२ कुंज-विकास ,,

३ जुईच्या कळ्या ,,

४ भावनांचे खेळ ,,

५ वाघाची मावशी आणि इतर गोष्टी ( मुलांकरितां )

६ कुरूप राजकन्या व तेरावी कळ आणि
इतर गोष्टी. ( मुलांकरितां )

## अप्रकाशित

१ मोगरीच्या कळ्या ( लघुकथासंग्रह )

२ अद्भुत गोष्टी व दंतकथा ( मुलांकरितां )

३ निबंध, व्याख्यानें व भाषणें.

४ उसनें वाण ( भाषांतरित लघुकथा )

# भावनांचे खेळ १

रात्रीची वेळ. करुणा आंतबाहेर खेपा करीत होती. रात्रींचे पावणेदहा वाजून गेले होते, तरी अरुणचा घरीं पत्ता नव्हता ! नेहमींचा क्रम म्हणजे ऑफिस सुटतांच घरीं यायचें आणि चहा घेऊन दोघांनीं फिरायला जायचें. नंतर घरीं आल्यावर जातांना लावून ठेवलेल्या कुकरमधील अन्न वाढून घेऊन जेवायचें. त्यांचा साराच दिनक्रम कसा रेखीव, ठरलेला, अगदीं वेळच्या वेळीं होणारा. त्यांत कशानें जर खंड पडणार असेल, तर त्याची माहिती आधींच अेकमेकांना द्यावयाची.

" मग आज असं कां ? कुठं गेले असतील अरुण ? इथं तर आपण नवीनच आलों आहोंत. फारशी ओळखहि नाहीं कुणाची. का कुठं अपघात तर झाला नसेल ना ? अरे देवा ! " करुणेचे विचार अधिक गतीनें धावूं लागले. इतक्यांत चिरपरिचित पदरव कानीं आला व अधीर करुणा पुढें आली. पतीवर झट्कन् आपादमस्तक दृष्टि टाकून तिनें प्रश्न केला,

" किती उशीर हा ! कुठं गेलां होतां इतकी रात्र होईतों ? "

छत्री-टोपी तिच्या हातीं देऊन बटणें काढीत काढीत अरुण म्हणाला,

" गेलों होतों अेका जुन्या मित्राकडे. "

" जुन्या मित्राकडे ? "

" हो. अगदीं जुन्या ! अितका जुना, कीं मी त्याची ओळखसुद्धां पार विसरलों होतों. पण त्यानं ऑफिसांत चिठी पाठवली अन् बोलावलं. "

" पण जुन्या मित्राला भेटायची ही वेळ वाटतं ? इकडे मी एकटी ! ना ओळख ना देख ! किती भीति वाटली मला ! "

" मी हरवलों असेन असं वाटलं कीं काय ? कीं कुणीं पळवून नेलंसं वाटलं लहान मुलाला ? "

" चला ! बरी थट्टा सुचते सदान् कदा. मघापासून हजार विचार आले मनांत, आहे का कांहीं कल्पना ! कुकरसुद्धां गार होत आला. "

" अग, पण इतका मोठा अन् इतका जुना माणूस. त्यानं मुद्दाम होऊन इतकी आपुलकीनं चिठी पाठवली, मग नको का जायला ? जुन्या गोष्टी निघाल्या. बोलतां बोलतां वेळाचं भान राहिलं नाहीं. झाला उशीर."

" एवढं भान भुलवणारा कोण तो जुना मित्र ? नांव तरी कळेल का ?"

" हां हां. क्युंव नहीं ? " नाटकी आविर्भावानें हसत हसत अरुण म्हणाला. " पण एका अटीवर. आधीं जेवायला वाढा बुवा ! भूक फार लागलीय्."

वाढतां वाढतां करुणा म्हणाली,

" कां ? जुन्या मित्रानं नुसत्या गोष्टी ऐकवूनच गार केलं ? कांहीं आतिथ्य ? उपचार ? पाहुणचार ? कीं शिष्टाचार कांहीं नाहींच ? "

" काय करणार बिचारा एकटा फकीर ! करीत होता कांहीं धडपड; पण मींच थांबवला. म्हटलं, कांहीं नको ! "

" पुन्हा तेंच. अहो, पण सांगाल का हा कोण तुमचा एकटा फकीर अन् विकीर तो ! "

" नांव सांगतांच तूं ओळखशील. "

" मी ? "

" हं. "

" मग सांगा ना ? "

" जयंत ठाकूर. उंदीरखेड्याचा जहागीरदार. "

" काय ? जयंत ठाकूर ? "

" तूं ओळखतेस ना त्याला ? "

" कोण म्हणतं– ? "

" अरे वा ! त्याचं नांव घेतांच आतां तूं चमकलीस, अन् तोहि म्हणत होत ओळख होती म्हणून. "

" हं. आठवतं. थोडी पुसट पुसट ओळख. ..."

" माझी तरी कुठं दाट होती ? चारसहा वेळां गाठी पडलेल्या. ऐकून होत स्वारी छंदीफंदी आहे. तेव्हां दुरूनदुरूनच वागत होतों. अन् आतां तर आठवण बुजली होती. पण त्यानं ठेवली. आपण इथं आल्याचं ऐकलं अन् निरोप पाठव फारच जुन्या जुन्या गोष्टी काढून बोलत होता मोकळेपणीं. "

" जुन्या गोष्टी ? " आवंढा गिळून तिनें विचारलें.

" हं. " तो हसतहसत हुंकारला.

" त्या कसल्या ? "

" अशाच आपल्या कॉलेजच्या, गॅदरिंगच्या, भ्रातृमंडळाच्या सभांच्या... आपल्या इकडच्या तिकडच्या गप्पा ! "

" अस्सं. "

" पण त्या जुन्या गप्पा ऐकून मन अगदीं ताजंतवानं झालं. इतक्या मजेशीर गोष्टींचा साठा आपल्या मनांत दडून आहे यांची आपल्याला दादसुद्धां नसते. किती आपण मागं जातों ! आपलं त्या वेळचं स्वरूप पुन्हा पाहातों ! "

" स्वरूप ? "

" हं. अन् मनावरचं दडपण फेकून देतों. म्हणजेच कांहीं वर्षांनीं लहान होऊन स्मृतिसागरांत पोहूं लागतों. त्या वेळीं आपलं चालू व्यवहारी जीवन किती कृत्रिम अन् हिडीस भासतं ! "

" अँ !

" एखाद्या जुन्या मित्राला फारां वर्षांनीं भेटल्यानं एवढ्या आनंदाची प्राप्ति होते, हा अनुभव मला तरी नवाच पाहा. "

" अस्सं. "

" 'अस्सं-अस्सं' काय चालवलंय् मघापासून ? तो तुलासुद्धां भेटायला येणार आहे. "

" मला ? "

" हो. मग कळेलच किती आनंदी प्राणी आहे तें ! "

" मला कशाला ? "

" कां ? ओळख आहे ना तुझी ? "

" ओळख ! " ती हळूच पुटपुटली. तिचा चेहरा गोरामोरा झाला. आवाज कांपरा आला. ठसका लागल्याचें निमित्त करून ती आंचवायला उठली. हाततोंड पुसतां पुसतां तिनें हळूच त्याच्याकडे निरखून पाहिलें. आनंदाशिवाय त्याच्या मुद्रेवर इतर विकार कांहींच नव्हते. तिला आश्चर्य वाटलें. झाकपाक करतांना ती दुरूनदुरून त्याच्या मनाचा ठाव घेत होती. मुद्रेकडे साशंक बघत होती. पण

ती ज्यांना भीत होती ते भाव त्याच्या मुद्रेवर नव्हते. तिला हायसें वाटलें. त्याला सुपारी देतांना तिचे हात जरा कांपतच होते; पण तिकडे त्याचें मुळींच लक्ष नव्हतें. हें पाहून तिला जरा बरेंहि वाटलें आणि वाईटहि वाटलें. सुपारी चघळीत तो म्हणाला,

"त्याच्या पुस्तकांचा संग्रह फार मोठा आहे बरं का. कांहीं पुस्तकं त्यानं मला दाखवलीं, तीं दुर्मिळ आहेत. दुसरीकडं मिळायचीं नाहींत. तुला माहीतच असेल म्हणा!"

"मला?"

"हं. आतां लपंडाव नको. आम्हांला कळलंय् सारं. त्याच्या लायब्ररींतलीं मराठी पुस्तकं तूं बहुतेक वाचून टाकलींस. खरं ना?"

"अरे बापरे!"

तिचा हा मूक आवाज होता. जोरानें ओरडावें असें तिला वाटलें; पण तसें तिला करवेना. तिचा जीव गुदमरून गेला. तिच्या मनांत जोराची चमक निघाली.

"जयंत, मीं तुम्हांला एकदा झिडकारलं अन् सारं तें विसरून गेलें. पण तो दंश मनीं धरून तुम्हीं पुन्हा माझ्या आयुष्यांत असे उमटाल असं वाटलं नव्हतं मला."

तिचे डोळे भरून आले. अश्रू ओघळूं न देण्याची शिकस्त करीत दृढ स्वरानें ती म्हणाली,

"पुस्तकं वाचणं हा कांहीं गुन्हा तर होत नाहीं ना?"

"कोण म्हणतो? उलट आमच्या राणीसरकार इतक्या शहाण्या कशा झाल्या या गोष्टीचं कोडं उलगडलं. इतकीं चांगलीं पुस्तकं वाचून कोण नाहीं बहुश्रुत होणार?"

तिला वाटलें, "फुंकर घालूनघालून उदरानं विषारी चावे घ्यावेत तसाच चाललाय् हा प्रकार! अर्थ तरी काय याचा? त्यापेक्षां स्पष्टच काय बोलायचं, विचारायचं तें बोलून कां नाहीं टाकीत? असं आडूनआडून कां?"

ती धाकधूक मनानें त्याच्याकडे पाहातच राहिली. तो पुढें म्हणाला,

"आणि तूं वाचलेल्या पुस्तकांत खुणा केल्या होत्यास त्याहि त्यानं मला दाखवल्या."

तो हसतहसत तिच्याकडे पाहात राहिला. तिला तें पाहाणें असह्य वाटलें. ती मनांत म्हणाली,

" आणखी कायकाय दाखवलं, सांगितलं, देव जाणे ! काय दुष्ट माणूस तरी ! जसा काय माझा सूड घेतो आहे विनाकारण. अन् हेसुद्धां किती उपरोधिक बोलतात ! जसे आडून छरे झाडतात. काय काय भरवून दिलं कोण जाणे मनांत !"

तिचा जीव गुदमरूं लागला. रात्रीं तिला झोंप लागली नाही. अरुण स्वस्थ घोरत होता. यांतच तिनें समाधान मानून घेतलें. तरी दुसऱ्या दिवसाची चिंता तिला जाचतच होती.

दुसऱ्या दिवशीं नित्याप्रमाणेंच अरुण उठला. नित्याप्रमाणेंच सारे व्यवहार चालले होते. पण करुणेचा जीव उगाचच खालवर होत होता. जेवतांना अरुण म्हणाला,

" अरे वा ! आज अळवाच्या वड्या केल्या आहेत काय ? जयंत म्हणत होता, आपल्याला अळवाच्या वड्या फार आवडतात म्हणून. "

" अरे देवा ! आला पुन्हा जयंत ! "

करुणा मनांतच कुरकुरली. अरुण पुढें म्हणाला,

" पण त्या तळलेल्या नकोत. तुझ्यासारख्या उकडलेल्याच आवडतात त्याला. "

आणि तो हंसला. करुणा चमकली ! तिच्या हातांतली वड्यांची ताटली एकदम खालीं पडली. त्यामुळेंच अरुणचें लक्ष चालू विषयापासून दुसरीकडे वळलें. तसेंच करुणेचेंहि ! खालीं सांडलेले पदार्थ आरोग्याला कसे विघातक असतात या विषयावर त्यानें एक लहानसें व्याख्यानच तिला ऐकविलें. पण तिचे कान काम करीत नव्हते. कारण तिची दृष्टि एक निराळेंच दृश्य पाहाण्यांत गुंतली होती.

" अळवाच्या वड्या उकडून ठेवलेल्या आहेत. संध्याकाळीं भाऊ आल्यावर तळून गरम गरम त्याला खायला द्यायला बजावून आई बाहेर जाते. नंतर एक तरुण प्रवेश करतो आणि एखाद्या नायकाच्या अभिनिवेशानें साऱ्या वड्या खाऊन फस्त करतो. एक तरी वळकटी वांचविण्याबद्दल नायिका गयावया करून सांगते; पण तिकडे तो दुर्लक्ष करतो. शूरानें शत्रूचा निःपात करावा त्याप्रमाणें तो वड्यांचा फडशा करतो नी कांही वेळानें निघून जातो. नंतर मग संध्याकाळीं भाऊ येतो. ' खायला कांही चांगलं नाहीं ' म्हणून तो कुरकुर करतो. मग आई येते तीहि रागावते. नायिका सांगते, ' मैत्रिणी आल्या, त्यांना थोडा मासला दाखवला. त्यांना तो फार आवडला. आणि मग त्यांनीं साऱ्याच वड्या संपवल्या !' आईला खरें वाटतें. तरीपण तिचें थोडें बोलून घ्यावें लागतेंच. परंतु चांगला बहाणा वेळेवर करतां आला आणि फारसें खोटेंहि नाहीं बोलावें लागलें.

' नरो वा कुंजरो वा ' च फक्त केलें. याबद्दल मनांतल्या मनांत हसत नायिका उठते व मायाळूचीं भर्जी भावाला करून देते. भाऊ व आई दोघेंहि खूष होतात. "

सारें दृश्य कसें स्पष्ट तिला दिसत होतें ! आणि तिला भीति वाटूं लागली. आळूवड्यांची आवड सांगतांना त्यानें ही गोष्ट पण सांगितली कीं काय यांना ? तिला कसेंसेंच वाटूं लागलें. अरुण आपल्या घाईंतच होता. तरी जातांना तिच्याकडे निरखून पाहात म्हणाला,

" तुला बरं वाटत नाहीं कीं काय ? डोळे कां असे ओढलेले दिसतात ? "

डोळ्यांतल्या गंगा–यमुना संगमासाठीं धाव घेऊं पाहातच होत्या. त्यांना बांध घालीत ती म्हणाली,

" हो. थोडंसं डोकं दुखतंय्. "

तिला विश्रान्ति घ्यायला सांगून अरुण बाहेर पडला. एकान्त हाच तिच्या मनाला विश्राम होता. पलंगावर पडल्यापडल्या ती शांतपणें विचार करूं लागली.

खरंच, इतकी मी कां भितें ? एखाद्या माणसाशीं ओळख असणं, लग्ना-विषयीं बोलणं निघणं किंवा वदंता उठणं यांत जगावेगळं काय आहे ? असे प्रसंग तर प्रत्येक तरुण मुलीच्या आयुष्यांत अनेक येतात. नव्हे, वडील माणसंच आणतात. फरक इतकाच, कीं यांत मुलांमुलींचा ओळखीचा संबंध बहुधा नसतो. दुर्दैवानें वडील नसल्यामुळं त्यांचं हें काम मीं माझ्या हातीं घेतलं होतं म्हणजे कांहीं पाप केलं नव्हतं. हो, त्याच्या चांगुलपणानं मला मोहिनी घातली होती हें खरं आहे. पण दिसतो तसा तो नाहीं अशी खात्री होतांच मी परत फिरलें नाहीं काय ? असं परत फिरतांना मनाचं काय झालं तें मनालाच ठाऊक ! त्यानं तरी माझीं किती आर्जवं केलीं ! एखादं कच्चं दिल विरघळून गेलं असतं. सुदैवानं मी वांचलें. किती तडतड टाकून बोललें मी ? किती निर्भर्त्सना केली ! तो डाव मनांत धरून माझ्या मार्गांत काटे पेरायला आलांत का जयंत ? "

तिची विचारमालिका मध्येंच तुटली. दार वाजलें. कोणीतरी आलें होतें.

तिनें दार उघडलें. दारीं एक अनोळखी गृहस्थ उभा होता. ती पाहात राहिली. तोहि क्षणभर पाहातच राहिला. तिनें विचारलें,

" कोण पाहिजे ? "

तो म्हणाला, " करुणा. "

" कोण ? "

" मी जयंत. "

" जयंत ठाकूर ? "

" हं. "

तीव्र स्वरानें ती म्हणाली, " कां आलांत तुम्ही ? ते घरीं नाहींत अन..."

" मी तुलाच भेटायला आलों आहें, करुणा ! "

" मला ? माझ्याशीं तुमचं काय काम आहे ? "

" कांहीं विशेष नाहीं "

" मग काय मागच्या गोष्टी उकरून काढून त्रास द्यायला आलां आहांत ? "

" नाहीं नाहीं. तूं सुखी झालीस हें पाहायला अन् मी पश्चात्तापानं पावन होत आहें हें सांगायला आलों आहें, करुणा. "

" म्हणजे ? "

ती कोचावर बसली. खुणेनेंच तिनें त्याला खुर्ची दाखविली.

" कधीं आलांत ? "

" इथंच असतों. "

" मग तिकडे दौलतजादा कोण करतं ? "

" किती कठोर बोलतेस ! "

" खोटं नाहीं ना बोलत ? "

" त्या पूर्वजन्मींच्या गोष्टी होत्या करु..."

" पुरे करा ! "

" माझ्यावर विश्वास बसूं नये असंच माझं वर्तन तेव्हां होतं– "

" आणि आतां तुम्ही त्यांच्या कानांत तें विष ओतायला आलांत, नाहीं का ? "

" नाहीं. मी तुमची मैत्री जोडायला आलों आहें. "

" एवढे उपकार तुम्ही न कराल तर बरं होईल, जयंत ! तुमच्याशीं माझी इतकी ओळख होती याचा पुरावा म्हणून एखादं पत्र तुमच्याजवळ आहे एवढं कळलं तरी तें मी इकडच्या मनांतून उतरायला पुरेसं होईल. "

" चुकतेस तूं. तूं समजतेस इतका कांहीं अरुण संकुचित मनाचा नाहीं. आणि मी असं विचारतों, कीं जगांत काय तरुण मुलांमुलींच्या ओळखी होतच नाहींत ? त्यांच्यांत लग्नाचीं बोलणींहि निघत नाहींत ? "

" निघतात; पण–"

" पण मी एवढा पात्र नव्हतों असंच ना ? खरं आहे. पण असं पाहा, कीं एखाद्या दुर्दैव्याचे आईबाप लहानपणींच मरावेत आणि तरुणपणीं सत्ता व संपत्ति त्याच्या हातीं यावी यापरती आपत्ति दुसरी कोणतीच नाही. त्याचा परिणाम जो झाला तोच व्हायचा. एखाद्या देवतेनं त्या दुर्दैव्यावर अनुग्रह केला तरच कांहीं तरणोपाय– "

" जयंत, आतां तुम्ही जाल का ? "

" अरेरे, एखाद्याची एकदा अधोगति झाली कीं झालीच ! पडल्याची पुरती पायमल्ली करायची—त्याला वर म्हणून येऊंच द्यायचं नाहीं, हा जसा कांहीं जगाचा ठरलेला नियम ! त्याला तूं तरी कशी अपवाद असशील ? "

" तुमचं म्हणणं तरी काय ? मी काय करावं म्हणतां ? "

" कांहीं नाहीं. तुमच्या दोघांच्या मैत्रीची फक्त भी याचना करीत आहें. त्या वेळीं तूं मला झिडकारलंस, तिरस्कार केलास, हा माझ्यावर एकपरी अनुग्रहच झाला. त्यामुळंच माझे डोळे उघडले, शुद्धीवर आलों आणि एवढ्या तपश्चर्येनंतर माणसांत बसलों आहें. नाहींतर कुठं वाहवत गेलों असतों कल्पना नाहीं ! तिरस्कारानं इतका सुपरिणाम झाला तर स्वीकारानं किती होईल ? असले प्रश्न आतां व्यर्थ आहेत. एकंदरींत तुझंच गणित बरोबर होतं. तूंहि हिऱ्याची निवड केलीस. पण... पण गारगोट्या अगदीं पायदळींच तुडवल्या पाहिजेत असं नाहीं करु..."

बोलतां बोलतां त्याचा स्वर कांपरा झाला. थोडया वेळानें तो पुन्हा म्हणाला,

" एखाद्या कलावंताच्या हातीं पडल्या तर त्यांच्याहि मूर्ती होतात; आणि तूं तुझ्या स्मृतीनं मला माणसांत बसवलंस हें मी कसं विसरूं ? पण मी माझ्या मुलासाठीं ही याचना करायला आलों होतों. "

" मुलगा आहे तुम्हांला ? "

" हो. आईवेगळा जीव ! वाढतो आहे तिकडे. इतिहासाची पुनरावृत्ति होऊं नये. चांगलं वळण लागण्यासाठीं तुमचं दार त्याला उघडं असावं म्हणून आशेनं आलों होतों. असो. सुखी असा ही प्रार्थना ! "

तो सद्गदित झाला. करुणेलाहि कणव आली. पण ती इतकी भांबावून गेल

होती, कीं तिला कांहींच बोलवलें नाही. तो उठला आणि जाऊं लागला, तरीहि ती स्तब्धच राहिली. तो गेल्यावर मात्र तिला वाईट वाटलें.

"भारीच आपण कठोर झालों. इतक्या वर्षांनंतरहि आपला राग जशाचा तसाच कायम आहे. अन तो...तो किती निवळला आहे!

तिच्या मनांत आणखीहि अनुकंपेचे विचार आले. निदान 'आपण शिष्टाचार तरी पाळला नाहीं.' असें तिला वाटूं लागलें. इतक्यांत दारीं चाहूल आली. जयंताचा हात धरून अरुण त्याला ओढीत आणीत होता. आंत शिरतांच पत्नीला उद्देशून तो म्हणाला,

"हें काय? घरीं आलेल्या पाहुण्याला चहाबिहा कांहीं द्यायचा कीं नाहीं? शिष्टाचाराच्या गोष्टी कालच मला विचारीत होतीस, आठवतं का? अन् आज आता तूं! अँ?"

मोठमोठ्यानें हसत आणखी काहीं बोलण्याच्या बेतांत तो होता. पण करुणा आंत गेली. थोडक्याच वेळांत चहा-फराळाचें आलें. अरुण हसत हसत म्हणाला, "तुम्हांला अळवाच्या वडया आवडतात असं तुम्हीं काल म्हटलं होतं ना जयंत? आज आमच्या घरीं आयत्या झाल्या होत्या."

"बरं, मग?"

"तिच्या हाताला जीव असेल तर ना? साऱ्या सांडून टाकल्या! मी सांगतों जयंत, तुम्हीं आतां दिवाळींत इथंच राह्यला या, मग खूप खूप–"

"पुरे पुरे! दिवाळींत आळवाच्या वडयांचीच जशी काय मोठी अपूर्वाई...!"

असें बोलून करुणा झट्कन् आंत गेली आणि एक उकडलेली वडी घेऊन आली. ती पाहून अरुण म्हणाला,

"अरे वा! आहेत वाटतं?"

"आहेत म्हणजे! घरांत सुगृहिणी असल्यावर काय असणार नाहीं?" जयंत म्हणाला.

यावर दोघेहि मनापासून हसले. त्या दोघांना मोकळेपणानें हास्यविनोद करतांना पाहून करुणेलाहि हसल्याशिवाय राहावलें नाही. हसत–बोलत चहापान झालें. कित्येक जुन्या मित्रांची व गंमतीच्या गोष्टींची आठवणीनें विचारपूस झाली आणि

दोघां मित्रांच्या मोकळेपणींच्या गप्पागोष्टींनीं वातावरण इतकें आल्हाददायक झालें, कीं क्षणापूर्वी याच दिवाणखान्यांत तीनपैकीं दोन व्यक्तींमध्यें प्रक्षुब्ध वातावरण निर्माण झालें होतें ही गोष्ट कुणाला खरीसुद्धां वाटली नसती. करुणा मनाशीं म्हणत होती,

" मघाशीं मी इतकी प्रक्षुब्ध कां झालें ? आणि जयंतला इतकं टाकून कशाला बोललें ? यापेक्षां अधिक सौम्यपणानं मला बोलतां आलं नसतं का ? उगाचच आग पाखडली. उगाचच मी घाबरलें. "

आणि मग चारच दिवसांनीं दिवाळीचा सण त्यांनीं मोठ्या आनंदानें एकत्र साजरा केला. त्या आनंदांत भर घालण्याकरितां जयंतच्या मुलाला—छोट्या शरद्‌लाहि—आणविण्यांत आलें आणि तो लबाड करुणेला सोडून कुठेंच जायला तयार नाहीं.

---

## २ सुशीलेचे विचार

त्या वृद्धेला पुढच्या दारांतून आंत येतांना पाहून तिनें झटकन हातांतला पिळा घंगाळांत टाकला व दोन पावलें पुढें होऊन खालीं वांकून तिला नमस्कार केला. एवढें करतांना डोळ्यांत आलेले अश्रु तिला खालच्या खालींच टिपतां आले. वृद्धेनें "अष्टपुत्रा सौभाग्यवती भव. जन्मसावित्री हो." असा लांबलचक आशीर्वाद दिला तो ऐकून ती खिन्नपणें हंसली. तिचें तें हंसणें, वृद्धेला रडण्यापेक्षांहि केविलवाणें भासलें. तिनें तिच्या दंडाला धरून तिला नीट निरखून पाहिलें. तिच्या नाकाचा शेंडा लाल झाला होता. ओंठ थरथरत होते. तिचा तोल जात होता. वृद्धेनें झटकन तिला पोटाशीं धरलें व तिला कुरवाळीत ती म्हणाली,

" सुशीले, पोरी ! काय ग तुझी दशा ही ! "

ती गदगद हालत होती, यावरून हुंदके गिळतांना तिला किती प्रयास पडत आहेत हें वृद्धेला चांगलें जाणवलें. ती तिला थोपटीत म्हणाली, "उगी उगी बये !"

इतक्यांत घरांतून "आत्या ग. तुला आई बोलावतेय्" म्हणत मुलें आलीं. वृद्धेला पाहून "काकू आजी आल्या" "काकू आजी आल्या" असें ओरडत त्यांनीं वृद्धेचें आगमन जाहीर केलें. गृहस्वामिनी लगबगीनें बाहेर आली. वृद्धेचें आदरातिथ्य करण्याचें काम तिनें आपल्याकडे घेतलें. आणि पहिली तरुणी कांहीं झालेंच नाहीं, अशा आविर्भावानें आपल्या उद्योगास लागली.

स्नान, जेवणखाण होईतों सहजच संध्याकाळ होत आली, तोंपर्यंत काकूंनीं गृहस्वामिनीकडून बरीच माहिती गोळा केली. गृहस्वामिनीचें म्हणणें असें होतें,

" निव्वळ आततायीपणामुळं आपल्या नणंदेनं गोष्ट या थराला आणली. अगदीं तिचा ढालगजपणा हा ! दागदागिना, चिरगुट पांघरूण, सगळं आपल्या हातीं नेऊन परत दिलं. अन् आमच्या जिवावर येऊन बसल्या खायला काळ ! म्हणाल, असं म्हणते-पण खरं सांगा सासूबाई ! माझ्या मुलांबाळांचीं लिहिणीं उजवणीं व्हायचीं नाहींत का ? सारा जन्म आम्हीं यांना पोसावं, मग आमचं कसं व्हावं ?"
वृद्धेनें मान हालविली. सासूबाईंची अशी सहानुभूति पाहून सूनबाईचें तितकेंच सान्त्वन झालें. रात्रीं निजानीज झाल्यावर वृद्धा म्हणाली,

" सुशे, पोरी, हें असं कसं झालं ग ! "

" जसं व्हायचं तसंच झालं काकू. "

मोठा डौल आणून ती एवढें बोलली खरी. पण म्हणतात ना, ' तोफेच्या माऱ्यापुढें उभें रहावेल, पण दुःख पोटीं घेऊन मायेच्या उबाऱ्यापुढं उभं रहावणार नाहीं. ' तशी तिची स्थिति झाली. पुष्कळ दिवसांनीं सहानुभूतिपूर्वक विचारपूस करणारे भेटल्याबरोबर संयमानें स्वाधीन ठेवलेले हुंदके नी अश्रु धरणाचा बांध फुटल्यागत वेगानें बाहेर पडूं लागले. विचारण्याची ही वेळ नव्हे, हें अनुभवी वृद्धेनें ताडलें. कुरवाळून कुरवाळून मूकपणेंच तिनें तिला शान्त केलें. चार आठ दिवस लक्षपूर्वक तिनें सर्वांची दिनचर्या पाहिली. सगळीं कामें हिनें करावींत आणि करायला कांहींच उद्योग न उरल्यामुळें, नणंदेला फुकट पोसावें लागतें, याबद्दल सूनबाईनें दुःख करावें असा क्रम होता. लहान लहान मुलें सुद्धां आतेला मोलकरणीवजा लेखीत होतीं. भाऊ तेवढा कोणाचीच बाजू न घेऊन भलाई दाखवीत होता. पण त्याची ही न बोलून शहाणपणा दाखविण्याची पद्धत तिच्या बाबतींत अधिक घातुक ठरत होती.

एके दिवशीं निवांतपणा पाहून काकू म्हणाल्या,

" हें बघ, सुशे, तुझी सारी विचारपूस करून जमलं तर तुझ्या संसाराची घडी पुनः नीट बसवावी अशा विचारानं आलें आहें मी. पाहूं, मी नेऊन समोर उभी केल्यावर कसा जा म्हणतो तें ! तेव्हां मला सांग बरं. "

" काय सांगूं ? "

" इतकीं वर्सं संसार करून आत्तांच तुझ्या नवऱ्याला ही दुर्बुद्धि कशी आठवली ? "

टाळाटाळी करण्याच्या प्रवृत्तीनें खालीं पहात ती म्हणाली,

" कसली ? "

" दुसरं लग्न करण्याची ! "

दीर्घनिश्वास टाकून ती म्हणाली,

" कुणी जुने अन् हलक्या प्रतीचे कपडे टाकून ऐपतीप्रमाणें उंची कपडे घेतले तर ती दुर्बुद्धि म्हणतां येईल का ? "

म्हणजे ? कपड्यांची अन् बायकोची गोष्ट सारखीच वाटतं ? "

" पुरुषांच्या दृष्टीनं सारखीच नाहीं तर काय ? कपडे जसे निर्जीव पण शोभा अन् दर्जा वाढविणारे असतात, तशीच बायको ! "

" म्हणजे, तूं त्याची शोभा न् दर्जा वाढविणारी नाहींस ? "

" अर्थात ! मला काय त्यांच्या सभासमित्यांचं समजतंय ? का क्लबांत जातां येतंय ? एक दिवस नेलं होतं, तर क्लबचीच शोभा गेली सारी. माझ्यासारखी गांवढळ—"

" अन् हें त्याला इतक्या वर्षांनीं उमगलं ! "

" तेव्हां उमगूनही काय उपयोग होता ! तेव्हां अन्योन्य गरजेचा प्रश्न असल्यामुळं—"

काकू प्रश्नार्थक मुद्रेनें पहातच राहिल्या. तीच पुढें म्हणाली,

" बाबांची वाढलेली नी ट. फ. शिकलेली यथातथा रूपाची अशी ही लेंक हुंडयाशिवाय मामंजींनीं पत्करली ती काय गरजेशिवाय ? भरपूर हुंडा देऊनही कुठं पटली नसती ही हुंडी ! पण सासूबाई वारलेल्या, घरांत सगळा पोरवडा, तेव्हां मोठ्या वयाचा फायदा मिळून मी पास झालें ! नाहीं तर काय तिकडच्या योग्यतेची होतें मी ? "

" कशी ग एखाद्या निर्ढावलेल्यासारखी बोलते आहेस ? जणूं काय एखादी गोष्ट सांगते जशी ! पण आठ दिवसांत हुंदके व रडणं सारं पाहिलं आहे मी. "

" होय काकू. मन घट्ट दगडासारखं करायचा प्रयत्न करतें आहें मी. साधेल हळुहळू. "

असें बोलून तिनें डोळे टिपले.

" अग पण कां एवढं हें ? चल, जाऊं आपण तिथं अन् विचारूं त्याला. ' बाबारे ! एवढा योग्यतेला चढलास. अन् मानमान्यता मिळवलीस, ती कुणामुळं ? बायकोनं सारं घर आवरलन्, पोरवडा सांभाळला; म्हाताऱ्याच्या खस्ता खाल्ल्या नी तुला अभ्यासाला तिनं निर्वेध वेळ दिला. तिच्या बापानं वरपर्यंत तुझी वरणी लावीत नेली तेव्हांच ना ! त्या वेळीं ते कोंदे उपसायला आतांसारखी बीयेबेटी बायको करून आणली असतीस तर खरी शहामत ! जिनं तुझं मोडकळीस आलेलं घर रेघारूपाला आणलं, तिला आतां जुन्या चिंधीसारखी टाकून, बसलास घेऊन नवी राणी ! पण म्हणावं माझ्याशीं गांठ आहे ! चल तूं, बघतें मी ! "

खिन्नपणें हंसून ती म्हणाली,

" जाण्यांत आतां कांहीं अर्थ नाहीं काकू. त्या वेळेस त्यांना मोलकरणीच्या दर्जाच्या बायकोची जरुर होती. आतां गृहिणीची आहे !"

" म्हणजे तूं चांगली सुग्रणगृहिणी नाहींस वाटतं ?"

" सुग्रणपणा हल्लीं मोलानं मिळतो. सैंपाकिणीची त्यांना जरूर नव्हती हल्लीं. समानदर्जाची सुगृहिणी हवी होती त्यांना !"

" कपाळ त्याचं नि तुझं पण ! म्हणजे आपला हा सवद्यासारखा कारभार झाला—! लग्न म्हणजे—"

" सवदाच आहे. दुसऱ्यानं केला म्हणजे वाईट वाटतं. स्वतः केला म्हणजे समर्थन सुचतं इतकंच !"

" काय म्हणतेस तूं ? समजलं नाहीं मला."

" त्यांची अडचण पाहून बाबांनीं आपली गळयाला लागलेली अशिक्षित पोर, ' बरी बिनहुंड्यानें ब्याद जाते, ' म्हणून दिली. अन् मामंजींनींही घर सांवरणारी सून मिळाली म्हणून स्वीकारली. आणि हें सारं लक्षांत घेऊन यांनीं आजपर्यंत चालवून घेतली. हा सवदाच नाहीं तर काय ? गरीबींत मोडक्या झोपडींत राहिलें म्हणून पुढं कुणी उंच माड्या उभारूंच नयेत कीं काय ?"

" उभाराव्या कीं, खुश्शाल उभाराव्यात. हूं. मग एकूण हें सारं तुला संमत आहे तर ? अन् मग ग कशाला रडतेस !"

चढ्या स्वरानें परंतु खिन्नतेनें काकूंनीं विचारलें.

" नाहीं—संमत नाहीं मला. मी बोलतें आहें ती आंतड्याला पीळ पडूनच बोलतें आहें. अन् म्हणूनच आंवरलं तरी रडं येतं आहे. पण माझा मूळावर कटाक्ष आहे. वेळींच एक टांका घालायचा आळस झाला तर नऊ टांके घालूनही उपयोग होत नाहीं, तसं आहे हें. बाबांना जांवई उत्तम पाहिजे होता. ज्यांची उत्कृष्ट ' करियर ' वाखाणली जाऊन उज्ज्वल भविष्याची ग्वाही मिळत होती, त्यांना त्यांनीं पसंत केलं. पण आपली लेंक पुढंही त्यांच्या योग्यतेला शोभेल कीं नाहीं हा विचार मात्र केला नाहीं. रूप, शिक्षण याबद्दल म्हणतें हो मी."

" समजलं, पण तो प्रश्न त्याचा नव्हे का ? त्यानं तो त्याच वेळीं सोडवायचा. शहाणा म्हणून वाखाणला जाणारा तो. त्याचे डोळे काय बांधलेले होते ?"

" असं बाबांच्याबद्दलही म्हणतां येईल. त्यांनीं गरजवंताला अक्कल नसते हा मार्ग स्वीकारला. किंवा गरजेपोटीं धूर्तपणा अवतरला असं म्हणा पाहिजे तर. "

" मग असं तुझ्या वडिलांबद्दल कां म्हणत नाहींस ? "

" कसं म्हणूं ? मला असे चटके बसले असतांना कसं म्हणूं ? आपला उदार हिंदुधर्म आपल्या बाजूचा आहे. गरज सरल्यावर जुन्या लक्तराप्रमाणं केव्हांही बायको टाकतां येईल, किंवा अन्नावारी मोलकरीण म्हणून राबवतां येईल, अशी जिथं खात्री, तिथं प्रसंगीं कशीही बायको पत्करायला कुणी तयार झाल्यास नवल काय ? पण जन्म देऊन वाढवलेल्या मुलीची योग्यता माहीत असतां, तिला कुणाच्याही गळ्यांत लोढण्यासारखी अडकवणं किंवा रत्नासारखी बांधणं—दोन्ही प्रकार वाईटच—आणखी वर मुलीचं कल्याण केलं अशी शेखी मिरवणं हा नितांत मूर्खपणा आहे. "

" नवऱ्यापेक्षां बापावरच तुझा राग अधिक दिसतो. "

" कां असूं नये ? पुरेसं न शिकवितां लोंढण्यासारखी अडकवून बसले, पण कधीं काळीं जरूर लागली तर मुलीला कांहीं असावं अशी तरी तरतूद केली आहे का ? "

" अग, अग, सुशे, काय बोलतेस हें ! मुलीला पुढं दुःख होणार आहे असं वैरी तरी चिंतील का ? "

" कां चिंतूं नये ? वाईटाची कल्पना आधीं करून त्याची तरतूदही करून ठेवली पाहिजे. अन् ती असतेच म्हणा. इथंच पहाना, लग्न करून देऊन बाबा माझ्या ऋणांतून मुक्त झाले. पण मुलांच्या बाबतींत बघा. एका रक्तामांसाचे दोघे भाऊ गोडीनं एकत्र नांदणार नाहींत हें आधींच भविष्य करून एका घरांत भिंत बांधून दोन मुलांसाठीं दोन भाग वेगवेगळे करून ठेवले आहेत. याचा अर्थ काय ? बायकांची किंमत कुठंच कांहीं नाहीं, हाच ! मला तर तितकंसं कांहीं कळत नव्हतं, पण लग्न तरी नोंदवून केलं असतं, तर आज गोष्टी या थराला आल्याच नसत्या. आणि आल्याच असत्या तर पोटासाठीं कुणाच्या तोंडाकडं पहाण्याचा प्रसंग तरी टळला असता. "

" मग तुला अगदीं घरांतून ' जा ' म्हणून सांगितलन् कां त्यानं ? "

" नाहीं. "

" मग काय तूंच निघून आलीस ? भारीच बाई आततायी बायका तुम्हीं ! "

" माझ्या रहाण्यापासून सुख किंवा जाण्यापासून दुःख नव्हतं म्हणून मी आलें. "

" पण इथं तरी कोणतं सुख तुझ्यासाठीं वायां जात होतं ? माहेरीं आलीस हें तुझ्या मनाला समाधान असेल. पण एक पोर तरी बरा बोल बोलतंय तुझ्याशीं ? मोलकरणीच्या मोलानं वागवतात तुला—"

" त्याला माझा काय इलाज ? आपघर पारखं झालं म्हणून बापघरीं आलें. एका आईच्या पोटीं जन्म घेतला आम्ही. एकच रक्त आमच्या अंगांत. त्या रक्ताचा तो अपमान करतो, किंवा होऊं देतो त्याला मी काय करूं ? "

" काय करूं म्हणजे ? कसं झालं तरी तें तुझं सत्तेचं घर आहे. इथं असे हाल काढण्यापेक्षां तिथं दिवस काढलेले काय वाईट ? "

" फारच वाईट ! माझ्यानं तें होणार नाहीं काकू ! "

" अग, न व्हायला काय झालं ? पुष्कळांना दोन दोन बायका असतात. अन् पुढं त्या नीटही वागतात हो ! "

" असतील–वागत असतील; माझ्यानं तें होणार नाहीं. "

काकू प्रश्नार्थक मुद्रेनें पहातच राहिल्या. ती पुढें म्हणाली,—

" एका जागेवर दोन कारकून असं पुरुषांच्या व्यावहारिक जगांत तरी चालतंय का ? एका जागेवर एकच माणूस सन्मानानं राहूं शकेल–दोन नाहीं. "

" हा नियम इथं नाहीं. आपली बायकांची बाजू पडती. कसं झालं तरी ते पुरुष. पुराणांतरीं देवादिकांना सुद्धां पुष्कळ बायका होत्या हो ! "

" काकू, पुराणांतल्या वांग्याचं भरीत करूं नकोस इथं. वर्षांनुवर्षं गुलामगिरीचा पगडा बसून बायकांचीं मनं गंजून गेलीं आहेत म्हणून तूं असं बोलतेस. यापुढं माणुसकीच्या हक्कानं बायका जगल्या पाहिजेत. जी गोष्ट स्वप्नांत सुद्धां कालत्रयीं पुरुषांना खपणार नाहीं, ती आम्हीं जन्मभर चालवून घ्यावी ! बायकांना निदान माणुसकीचे हक्क तरी असले पाहिजेत कीं नाहीं ? त्यांना काय मन नाहीं ? "

" आहे, मन आहे—सारं आहे; पण त्राण नाहीं ना ? "

" येईल. "

" एवढं हें तुला वाटतं तर तूं कां नाहीं त्याच्याप्रमाणं शिकून आपली योग्यता वाढविलीस ? मग त्यानं कशाला केलं असतं हें ? "

"शिकण्याचा काळ 'रांधा, वाढा, उष्टीं काढा' यांतच गेला म्हणून सांगतें ना?"

"गेला तर गेला. पण आतां तरी 'साफ नाहीं जात मी' असं सांगून हक्कानं बसून खायचं कीं नाहीं? इतकं हें नाहीं अन् कसलं त्राण येईल म्हणतेस? माती!"

"हात्तिच्या. ती तर म्हणत होती, इथंच रहा. तुम्हीं कांहीं मला जड नाहीं!"

"अगबाई! खरं का? इतकी का ती चांगली आहे? अन् तरी तूं तिचं ऐकलं नाहींस? कमाल बाई तुझी!"

"काकू, तुझीच कमाल वाटते मला. अग ती सुशिक्षित आहे, सुंदर आहे, अन् सद्गुणीही आहे. पण तिनं माझ्या संसाराची होळी करून तीवर आपली पोळी भाजून घेतली आहे हें मी कसं विसरूं? अग दीडतपावर दिवस होत आले. ज्या घरांत मालकीण म्हणून मी वागलें, त्या घरांत एकादीनं येऊन सांगायचं— मोलकरणीप्रमाणं रांधा, वाढा, उष्टीं काढा; अन् मग खुशाल पोटभर पोटाला खा. तर तें मी ऐकूं म्हणतेस? अग एकाद्या घराची, जमिनीची अगर पैशाच्या व्यवहाराची कुणी नुसती तीन वर्षें वहिवाट केली, तर त्याचा म्हणे मालकी हक्क शाबीत होतो; मग मी तर दीड तप मालकीण म्हणून मिरवलें, ती तिच्या कृपेवर पोट भरूं म्हणतेस? अग काकू! नायकिणीच्या दारीं हत्ती बांधला तर तो तिचा होतो म्हणतात. असे त्यांचेसुद्धां हक्क आहेत. हक्क नाहींत तेवढे लग्नाच्या बायकांचे. त्यांनीं वाटलं तर सोन्यानं मढवून मालकिणी कराव्यात, नाहीं तर वाटेल तेव्हां दागदागिने ओरबाडून घेऊन टाकाऊ वेलीप्रमाणं दूर भिरकावून द्याव्यात!"

"त्याला एक विचार नाहीं. पण ही एवढी शिकलेली! चालत्या गाड्याची खीळ कशी काढावी, एवढा विचार असूं नये का हिला! आमच्यासारखीं अडाणी माणसं सुद्धां सवतीवर मुली द्यायला कचरतात—"

"तिला तिचा प्रभाव माहीत असतां, या निर्जीव सवतीचं कसलं आलंय भय! तीन माणसांनीं दुःखी असण्यापेक्षां दोन माणसांनीं पूर्ण सुखी असणं बरं! असं तिचं म्हणणं आहे."

"वाः! वर आणखी वेदांत सांगण्यासारखंच आहे हें! हो, पण काय ग, लक्ष्मी म्हणत होती, तूं तुझे दागदागिनेसुद्धां आपल्या हातीं परत नेऊन दिलेस, खरं हें?"

" अगदीं खरं ! "

" हा काय शहाणपणा झाला ? बापानं सोय केली नाहीं म्हणतेस, अन् तूं तर आपल्या हातानं गैरसोय करून घेतेस. "

" कांहीं म्हण. "

" तुला कांहीं दरमहा तरी पाठवतो का ? "

" नाहीं. "

" नाहीं ? मग तूं मागूं नयेस ? "

"हक्क सोडण्याबद्दल याचना करून मोबदला मागणं माझ्यानं नाहीं व्हायचं काकू !"

" इकडे व्यवहाराच्या गोष्टी सांगतेस, अन् इकडे तर भावनेच्या वातावरणांत शिरतेस. असा तुझा भाऊ तरी कोण मोठा धनंजय लागून गेला आहे ? त्याला नी तुलाही समजूं नये हें ? "

" खरं सांगूं काकू ? भाऊ धनंजय नाहीं, म्हणूनच त्याला माझी जरूर आहे. तेव्हां तो माझी पोटगी मागून मला स्वावलंबी मुळींच करणार नाहीं. दोन्हीकडे आज माझ्यासारख्या गरजू अन् कामसू मोलकरणीची जरूर आहे. तिकडूनसुद्धां ' इकडे येऊन रहा. ' असं पत्र आलं होतं. पण जें घर मी रेघारूपास आणलं त्या घरांत मोलकरणीच्या मोलानं अन्नावारी येऊन मी रहाणार नाहीं, अशी दोन्हीकडे खात्री आहे. काकू ! हा सुद्धां एक प्रकारचा दोहों पक्षांत अन्योन्य सवदाच आहे."

" खरं, त्यांचं सारं ठीक आहे. पण, पोरी ! तुझे दिवस कसे निभायचे ? एकादं मूल बाळ तरी जगलं असतं, तर तेवढाच जिवाला विरंगुळा असता. "

" कुणाला ठाऊक, विरंगुळा होता कीं संताप तें ! "

" असं ग काय बोलतेस ? "

" खरंच, मुलं गेलीं त्याचं मला आजवर फार वाईट वाटत असे. पण तीं वांचलीं नाहींत, तें बरंच झालं असं आतां वाटतं ! "

कानांवर हात ठेवून आश्चर्यानें काकू तिजकडे पहातच राहिल्या. डोळे पुशीत ती पुढें म्हणाली,

" बिचारीं ! दैवानं हिरावून नेलीं हें दुःख खरं, पण माझ्याजवळून ओढून नेलीं असतीं, तें फार मोठं दुःख वाटलं असतं मला. आई फार निःस्वार्थी असते

असं म्हणतात, तें पशुपक्ष्यांच्या बाबतींत खरं असेल कदाचित्. पण मानवी आई नेहमींच स्वार्थी असते. आपल्या मुलांनीं चांगलं व्हावं, मोठं व्हावं, आपला शब्द झेलवा, आपली कीर्ति वाढवावी, म्हातारपणीं आपलं रक्षण करावं असा स्वार्थ तिच्याठायीं नेहमींच असतो. मी तरी त्याला अपवाद कशी असतें ? पण— माझ्या मुलांना काय शिकविलं गेलं असतं ? तुमची आई वाईट अन् म्हणून तिला टाकलेली आहे. तुम्हीं तिच्याशीं संबंध ठेवतां कामा नये. अंस सांगितल्या-शिवाय त्यांच्या चांगुलपणाचं समर्थन कसं होणार होतं ? पण—पण आपल्या मुलांकडून, वाईट म्हणवून घेणं, यापरतं दुःसह दुसरं काय आहे ! आपल्या मुलांच्या मनांतून उतरणं—छे, छे, मला ती कल्पनासुद्धां सहन करवत नाहीं."

"कशाला ! तुझीं मुलं तुला जवळ ठेवून घेतां आलीं असतीं."

"हो. लहान असेपर्यंत जोपासना करायला ? नंतर पुढं ज्यांचीं त्यांनीं नेलींच असतीं. आणि नसतीं नेलीं तर जें सुख मी भोगतें आहें त्याचींच ती वांटेकरी झालीं असतीं ना ! एकूण एकच !"

"कठीण ग बाई, कठीण आहे जगणं तुझं !"

"हं ! असे शहारे आले आमच्या सारख्यांची परिस्थिति पाहून, तर एक उपयोग होईल."

"काय ?"

"लग्नाच्या बाबतींत कांहीं सुधारणा कराव्या असं वाटूं लागेल लोकांना. पहा, इतर जातींतल्या बायकांच्या स्थितींत अन आमच्या स्थितींत किती अंतर आहे ? ख्रिश्चन, पार्शी वगैरेंत तर एक बायको जिवंत असतां दुसरी करतांच येत नाहीं. मुसलमानांत एका वेळीं चार बायका करतां येतात. पण प्रत्येकीच्या आर्थिक परिस्थितीचा विचार लग्नाच्या वेळींच होतो. बाप ठराविक रक्कम मुलीच्या नांवें व्याजीं लावतो. ती रक्कम असहायपणांत—म्हातारपणीं—तिला कामास येते. त्या रकमेला नवऱ्यानं हात लावणं कमीपणाचं समजतात."

"आमच्याकडे रक्कमच नाहीं."

"मुलाच्या बापाकडून नाहीं—पण मुलीचा बाप हुंडा देत असतो ना ? तोच मुलीच्या नांवानं ठेवला गेला तर ! पण तें व्हायचं नाहीं. आमच्यांत मुलींकडून पैसा घेण्यांत कमीपणा नाहीं, अन् मुली टाकण्यांतही नाहीं."

" तें असो ग. पण आतां तुझं कसं व्हायचं ? "

" हा तर अगदींच सोपा प्रश्न आहे ! वरचं बोलावणं येईस्तवर अन्नावारी राबायचं. दुसरं काय ? ती पहा, बेबी उठली. तो बाबू हांका मारतो आहे. झालंच तर आतां चहा दुधाची वेळ झाली. तिकडं नळ वाट बघतोय. बालसंगोपन, गृहव्यवस्था हीं सारीं खातीं आमच्याकरितांच आहेत ! "

काकूंनीं दीर्घ निश्वास टाकला. ती पुढें म्हणाली,

" त्या समोरच्या बंगल्यांत तान्हं मूल संभाळायला एक पगारी आया ठेवलेली आहे. तिनं तेंच मूल संभाळायचं. त्याच्यापेक्षां मोठीं दोन मुलं आहेत त्यांची जबाबदारी तिजवर नाहीं. तशी फिराबिरायला नेते बरोबर. पण " यांना अंघोळ कां घातली नाहींस ? " नाहीं तर " कोको कां पाजला नाहींस ! " असं कांहीं विचारतां नाहीं येत मालकिणीला ! तेंच आम्हीं ! दरवर्षी हलणाऱ्या पाळण्याची सारी व्यवस्था ठेवावी, तशीच चुलीची अन् साऱ्या घराची. पण मोबदला काय त्याचा ? तर दुरुत्तरं ! काकू, नुसतं ऐकून तुझ्या डोळ्यांना पाणी आलं, पण प्राणांतापर्यंत यांतून सुटका नाहीं, या कल्पनेनें जीवित किती दुःसह वाटत असेल याची कल्पना घरांत कुणालाच नाहीं. नाहीं तर दुरुत्तरं बोलून दुखऱ्या भागावर घाव घालण्यासारखी कृति त्यांनीं केली नसती. आमचं दुःख ऐकायलाही कुणी तयार नसतं. आमच्यासारख्यांची स्थिति सुधारायला पैशाचं कांहीं साधन असावं, टाकणाराला जाब विचारतां यावा असं कांहीं साधन आमच्या हातीं असावं असं नाहीं तुला वाटत काकू ? "

" वाटतं. पण मला एकटीला वाटून काय उपयोग ? मुलींच्या आईबापांना साऱ्यांनाच वाटलं पाहिजे. "

" होय, तोच सुदिन यावा असं मी म्हणतें ! "

---

# भोळा शेतकरी ३

एक होता शेतकरी. तो होता भोळा. तो कष्टानें जमीन कशी. परंतु जेमतेम वर्षाची बेगमी होई. पुढील वर्षाला बियाणें ठेवून, बाकीच्यांत तो लेंकरांबाळांची गुजराण करी. परंतु एकदां वेळेवर पाऊस पडला नाहीं. पेरे झाल्यावर त्यानें जे डोळे वटारले, ते बऱ्याचशा रोपांची खराबी झाल्यावर उघडले. त्यानंतर मात्र तो कसूर न करतां जोरानें पडला. पण त्याचा हा वर्षाव अवेळीं झाल्यामुळें मारकच झाला. दोन आणे पीक हातीं लागलें नाहीं. दुसऱ्या वर्षीहि तीच रड. सालोसाल असें होत गेल्यानें गरीब शेतकऱ्याचा टिकाव कसा लागावा? त्याचीं मुलेंबाळें व गुरेंढोरें अर्धपोटीं राहूं लागलीं. त्यांचे हाल निवारण्यासाठीं व पीक सांवरण्यासाठीं त्याला कर्ज काढावें लागलें. साहजिकच त्याचा शेतसारा थकला. दस्त लावण्यासाठीं त्याला ताकिदी मिळूं लागल्या. एके दिवशीं पाटलानें येऊन हांडींभांडीं बाहेर काढून सारा वसूल करण्याचें भय घातलें. बिचारा शेतकरी! अगदीं हताश होऊन सचिंत बसला. तेव्हां त्याची बायको म्हणाली—

"अस हातपाय गाळून कसं भागल? जुमीनदार साहेबांकड जा, अन् खरी गोष्ट त्यांच्या कानांवर घाला. आह्मीं आजवर कधीं दस्त लावायचा ठिवला नाहीं. आतां वखत वाईट आला म्हणून. ह्योरल्या सालीं देव दया दावील. काय असच दिवस ऱ्हातील? आवंदा सूट द्या म्हणावं कसय करून."

शेतकरी खिन्नपणें हंसून ह्मणाला,

"किती तूं वेडी? देवाचीच माया आटली तिथं माणसं काय करणार? वेळेवर पाऊस पडला असता तर कशाला हे दिवस येते? मी का जुमीन कसाया कुचराई करतों?"

"कोण ह्मणतं! जिथं सगळयांची दशा, तिथं आपलं तरी काय?—म्हणून ह्मणतें जा जुमीनदाराकड अन सांगा खरं. ह्मणावं, आमच्या शेतावर कांहीं झांकून पाऊस पडला नाहीं. सगळयांची दशा ती आमची."

पुन्हां खिन्नपणें हंसून तो म्हणाला,

"म्हणूनच म्हणतों तूं वेडी, अगदीं वेडी. अग दामू पाटलाची काय दशा झाली ती तूं पाहिलीस ना? तीच आपली." "त्यांचं काय? ते गुर्मीत बसून राहिले.

आपुन नमोइनं घेऊं. गरीबाचा देव पाठीराखा असतो. जा तुम्हीं." "जा कसं? कांहीं फळ आहे, का फूल आहे? असा हात हालवीत गेलो तर कसं गोड दिसल? तुजजवळ आहे कांहीं?" त्याचें ह्मणणें तिला पटलें. दगडाच्या देवापुढं सुद्धां पै पैसा, तांदूळ नारळ ठेवल्याशिवाय चालत नाहीं. मग हे तर साक्षात् भूदेव —भूमीचे मालक अन् त्यांच्याकडे थकलेल्या साऱ्याची सूट मागायची! ती विचारांत पडली. नंतर म्हणाली, "आहे, एक वस्तु नेण्यासारखी आहे. चार कांडं पिळून थाल तर त्यांत वऱ्याचीं खांडवं करून देतें, तीं घेऊन जा."

"अग पण शिजलेलं त्यांना कसं चालल?"

"काय बाई चवकशा? हसती बायको आन रडता पुरुष म्हणतात ते खोटं न्हाई! अहो, उंसाचा रस साऱ्या पुरशुमींत चालतो. आन वऱ्या उपासाला चालतात हें ठावं हायना? त्याला आक्षी इटाळ नाहीं."

शेवटीं तो कबूल झाला. त्यानें उंसाचीं चार कांडें पिळून रस आणला. तिनें वऱ्या भरडून रवा काढला व पाखडून पुखडून नीट केल्यावर, तिनें तो रवा उकळणाऱ्या रसांत वइरला. तें अभूतपूर्व पक्वान्न खदखदून शिजत असतां त्या शेतकऱ्याचीं भुकेलेलीं मुलें आशाळभूतपणें त्याच्याकडे पहात होतीं. पक्वान्नाच्या गोड वासानें त्यांच्या तोंडाला पाणी सुटत होतें. 'मला पुष्कळ पाहिजे.' 'मी परात घेणार' 'मी भांडं घेणार.' अशीं तीं आपल्या हक्काविषयीं आपआपसांत भांडतहि होतीं. मुलांना आंवरून तें पक्वान्न तयार करणें कठिणच होतें.

परंतु तिनें तें केलें. पुढच्या आशेवर नजर ठेवून केलें. तें पसरून, निवल्यावर त्याच्या तिनें छान चौकोनी वड्या कापल्या व कोऱ्या दुरडींत व्यवस्थित रचून वर केळीचें पान झांकलें व ती दुरडी तिनें नवऱ्याच्या डोक्यावर दिली. हें जोखीम् फार वेळ घरांत ठेवणें तिला धोक्याचें वाटलें.

नंतर आपल्या आकांत करणाऱ्या लाडक्यांना पुढें घेऊन, वड्या कापतांना पडलेले तुकडे व चुरा आणि पातेल्यांतील खरवड तिनें त्यांना वांटून दिली. एखादा तुकडा आपल्या तोंडांत घालणें तिला शक्य नव्हतें, पण नवऱ्याला थोडा चुराहि उरला नाहीं याचें तिला वाईट वाटलें. असलें गोडधोड कांहीं वारंवार होतें? पण करणार काय? मुलांची समजूत तर घातली पाहिजे आणि सगळें संपल्याशिवाय त्यांची समजूत पटणें शक्यच नव्हतें.

इकडे तो शेतकरी मोठ्या आशेनें जमीनदाराच्या वाड्यापाशीं गेला. पुढल्या आशेवर जीव गुंतलेला असल्यामुळें दोन कोस भुई तुडविल्याचे श्रम त्याला जाणवले नाहींत. मोठ्या प्रयासानें त्यानें वाड्यांत शिरकाव करून घेतला. वाड्यांतील बैठकखान्याभध्यें सर्वत्र पसरलेल्या झोऱ्याचा शेव दुमडून संकोचानें खालीं पहात तो जमिनीवर बसला. जणूंकाय तो मनाशीं ह्मणत होता,

"आई, भू-माते! इथं घरांत तुझ्या अंगावर जाड पांघरूण आहे. पण बाहेर ऊन पावसांत अन् थंडी वाऱ्यांत वावरणाऱ्या मला, आंग झांकायला पुरेशा चिंध्यासुद्धां नाहींत! माझ्या बाळांना—अरेरे!"

इतक्यांत जमीनदार साहेब आले आणि विचारमालिका तुटली. कांहीं चौकशा झाल्या. शेवटीं याची पाळी आली. प्रश्नार्थक मुद्रेनें जमीनदारांनीं त्याच्याकडे दृष्टिक्षेप केला. कारकुनानें 'पुढें हो' म्हणून सांगितलें. तेव्हां मोठ्या संकोचानें पुढें होऊन आदबीनें त्यानें ती दुरडी जमीनदार साहेबांपुढें ठेविली आणि हात जोडून तो उभा राहिला.

आपल्यासारखें मूर्तिमंत दैन्यच पुढें उभें असतां दीनवाण्या शब्दांची जरूरी काय? असें वाटूनच कीं काय, तो निस्तब्ध उभा होता. त्याचें तें बावळें ध्यान जमीनदारसाहेबांपुढें असें स्तब्ध उभें राहून जमीनदारसाहेबांचा उपमर्द करीत आहे, असें कारकुनास वाटलें. तो त्याच्यावर खेंकसला. जमीनदारसाहेबांनीं 'काय आहे?' म्हणून प्रश्न केला तेव्हां धीर करून तो म्हणाला, "कांहीं नाहीं धनी, हे कारभारनीनं मुलांसाठीं खांडवं दिलंत्" कपाळाला आंठ्या चढवून जमीनदार म्हणाले, "खांडवं? कसलीं खांडवं?" "होय धनी! वऱ्याचीं आहेत. रसांत केलींत!" त्यावरील केळीचें पान दूर करीत त्यानें उत्तर दिलें.

"काम काय आहे तुझं?"

"कांहीं नाही धनी! आंवदाबी पावसानं डोळ वटारल. कांहीं पिकलं नाहीं, तवा दस्त माफ व्हावा सरकार. फुडल्या सालाला" "चूप, जास्ती गडवड नको. पुढल्या सालीं खात्रीनें पाऊस पाडण्याचा तुझ्याजवळ कांहीं मंत्र आहे वाटतं? लबाड कुठला. चल जा, सूट बीट कांही मिळणार नाहीं. आठ दिवसांच्या आंत पैसे भरलेच पाहिजेत."

एवढें बोलून जमीनदारसाहेब उठले. कारण हा शेवटचा अर्जदार होता. त्यानें पुढें ठेवलेल्या दुरडीकडे बोट दाखवून जमीनदार साहेब ज़ातां जातां म्हणाले,—‘ अरे भिक्या, ती टोपली तबेल्यांत ठेव बरं. ”

भोळा बिचारा शेतकरी ! किती आशेनें आला होता. पण हें फर्मान ऐकून तो अगदीं हतबुद्ध झाला. त्याच्या हातापायांतलें चलन वलन नाहींसें झालें. शिपायानें जेव्हां रिकामी दुरडी त्याच्यापुढें आणून आदळली तेव्हां तो भानावर आला. रिकामी दुरडी हातीं घेऊन जड हृदयानें तो वाहेर पडला. आतां त्याच्या पायांना चालीचा शीण जाणवत होता.

“ अरेरे ! आलों तसंच जायाचं ? रिकाम्या हातांनीं व जड पावलांनीं. ”

त्याचें हृदय अगदीं आक्रंदून ओरडत होतें. “ अरेरे चांडाळा ! आपल्या भुकेलेल्या चिमण्या बाळांच्या तोंडचा घांस काढून तो फुकटाफाकट जमीनदाराच्या घोड्यासाठीं डोक्यावर वाहून आणलास ना ? ”

---

# चंद्रमणी ४

चंपकलाल आणि कंपनीच्या फर्ममध्यें विक्रीखात्याकडील ॲसिस्टंट मॅनेजरच्या महत्त्वाच्या जागेवर आज त्याची नेमणूक झाली होती. अगदीं खालच्या दर्जाच्या जागेवरून आपल्या हुशारीनें व कर्तबगारीनें वाढत वाढत तो आज ह्या उच्च दर्जाच्या पदावर आरूढ झाला होता. पण या जागींसुद्धां तो फार वेळ टिकून राहिलच, असा भरंवसा देतां येत नाहीं. त्याचा रुबाब, तरुण वय आणि त्याची हुशारी यांमुळें मालकाची त्याच्यावर बहाल मर्जी आहे. शिवाय आपली भाग्यदेवता आपणास या पदापर्यंत चढवील, अशी त्याची त्याला तरी कुठें कल्पना होती? तेव्हां यापुढें त्याचें आसन कुठें स्थिर होणार आहे हें कोणीं सांगावें?

कित्येक वर्षांपासून त्याच त्या जागीं नोकरी करीत असलेल्या अनेक प्रौढ व वृद्ध नोकरांच्यापुढून बढतीच्या जागीं जातांना त्याच्या तरुण हृदयाला जरा संकोचल्यासारखें वाटलें. बावरलेल्या दृष्टीनें तो त्यांच्यापुढून झटकन् निघून, आपल्या जागीं जाऊन बसला. लगेच एक कारकून पुढें येऊन नवीन कामकाज दाखवूं लागला. त्यानंतर त्यानें हलक्या आवाजांत सांगितलें,

'मालकाच्या हुकमावरून कापडविक्रीखात्याकडे एका स्त्रीविक्रेतीची नवीन जागा निर्माण केली आहे. पुष्कळ अर्ज आले होते. त्यांतून ह्या बाईची निवड झाली. आजच ती रुजू–'

त्यानें त्याच्या हातांतील कागद आपल्या हातीं घेतले. कारकूनच पुढें म्हणाला,

'शिलाईखात्याकडे जशा स्त्रिया आहेत त्याप्रमाणें. म्हणजे स्त्रीवर्गांत मालाचा खप अधिक होईल.'

कारकून निघून गेल्यावर अर्जावरील नांव त्यानें जरा मोठ्यानें वाचलें 'चंद्रमणी! वाः, काय पण छान नांव आहे!' नांवाची मालकीण शोधण्याकरितां त्याची दृष्टि आपोआप सभोंवार फिरली. खरेंच, आल्हाददायक कौमुदीनें दृष्टीला सौख्य द्यावें त्याप्रमाणें आपल्या गोड, मुग्ध सौंदर्यानें सभोंवतालची जागा प्रकाशित करीत एक तरुणी कपड्यांच्या कपाटांजवळ उभी होती खरी.

किती नाजुक आणि किती सुंदर! इतक्या कोंवळ्या वयांत असलें काम पत्कर-ण्याची पाळी तिच्यावर कां बरें आली असावी? अगदीं निराधार असेल का ती?

तिच्या वस्त्रांवरून तर वाटतें तसें. किती साधी आहे ती? रुंद काळ्या कांठाचें पांढरें शुभ्र पातळ आणि तसल्याच कांठाचा उघडया गळ्याचा ब्लाऊझ! पण त्यांतहि तिची देहलतिका किती शोभून दिसते आहे!

तिच्या डोक्यावरचा पदर पडलेला होता. उजव्या खांद्यापासून डाव्या बाजूला कंबरेपर्यंत तिच्या पदराची रुंद किनार रेखाकृतीसारखी पाठीवर पसरलेली होती. तिचा डौलदार डावा दंड तशाच रुंद किनारीनें झांकला होता; आणि केसाचें सौन्दर्य तरी किती अवर्णनीय होतें! केवडयाच्या पातीसारख्या पीतगौर मानेवर काळ्या मखमालीनें आच्छादिलेल्या लहानशा ढालीसारखा फुगीर पसरट आंबाडा, त्याच्याखालीं दोहोंबाजूला आंकडयासारखीं वळलेलीं मानेवरच्या केसांचीं दोन कुरळें. जणूं काय ढालींत खोंचलेल्या लहानशा जंवियाच्या काळ्या अस्तरणांतल्या दोन वांकड्या मुठीच!

एरवीं अशा ठिकाणीं अशा तऱ्हेनें उभ्या राहणाऱ्या स्त्रीला त्यानें असभ्यच मानलें असतें. पण आज या क्षणीं त्याच्या मनांत असले विचार येणें शक्यच नव्हतें. त्याची अनभ्यस्त दृष्टि तें पाठमोरें सौन्दर्य पाहून अगदीं दिपून गेली. अनेक लोक आपणास पाहूं शकतात अशा सार्वजनिक ठिकाणीं आपण आहोंत हें विसरून अनिमिष नेत्रांनीं तो तें सौन्दर्य निरखीत होता. 'काय रेखीव बांधा आहे! अठराच्या आंतच वय असेल!' तो मनांत म्हणत होता. इतक्यांत वरच्या मजल्यावरील शिलाईखात्यांतून कांहीं शिवून घेण्याकरितां आलेली शेठच्या नात्यांतील एक प्रौढा खालीं आली व त्या सुंदरीकडे दृष्टि जातांच तिच्या जवळ जाऊन म्हणाली,

'ओ, घेली, माथे ओढ, माथे ओढ जरा.' (अग वेडे, डोक्यावर पदर घे, डोक्यावर पदर घे जरा)

तरुणी चपापली, लाजली. तिचीं कर्णाग्रें लाल झालीं. तिनें झटकन् त्याच्याकडे पाहिलें तेव्हां वीज चमकल्यासारखें त्याला वाटलें. पटकन् तिनें आपल्या पदराची किनार दोहों हातांनीं उचलून आपल्या केशकलापावर अलगत टेंकली. तिच्या त्या स्वाभाविक हालचालींत त्याला कौशल्य दिसत होतें. तो मनांत म्हणाला,

'पदर तरी किती कलात्मक रीतीनें घेत आहे!' पण ती प्रौढा आणखी कांहींतरी तिला बोललीच. लगेच तिच्या मुखचंद्रावर अभ्रें आल्यासारखें त्याला वाटलें.

'शेठच्या घरची असली म्हणून काय झालं? नवीनच नोकरीवर आलेल्या माणसाला असें बोलायचें? चूक होतेच आहे माणसाकडून. त्यांतून ती लहान. बिचारी प्रसंगामुळें नोकरीवर आली असेल. गरीब झाली म्हणून एवढ्याशा पदरासाठीं इतकें बोलायचें? श्रीमंत लोकांच्या संवयीच वाईट! गरीबांना तुच्छ लेखणें हाच त्यांचा मोठेपणा! ही बया गेल्यावर सहानुभूतीच्या शद्बांनीं तिची खिन्नता घालविली पाहिजे. नाहींतर विचारी बुजून जाईल, अन् कामावर येणारहि नाहीं कदाचित्! अन् त्यामुळें अडचण होईल तिची! हो, दुसरी नोकरी तरी चटकन् कुठें मिळणार तिला?'

त्याचे असे परोपकाराचे विचार आणखी कितीतरी लांबले असते; पण कांहीं महाराष्ट्रीय स्त्रिया दुकानांत शिरल्यामुळें गिऱ्हाईक पाहून तो भानावर आला. ती संधी घेऊन तो तिच्याजवळ गेला आणि शक्य तितक्या मृदु शद्बांत त्यानें तिला गिऱ्हाइकांना माल दाखविण्यास सांगितलें. ती क्षणभर गोंधळली, अडखळली व चकितपणें त्याच्याकडे पाहूं लागली. क्षणभरच. नंतर लगेच ती गिऱ्हाइकांची मागणी पुरविण्याकरितां उल्हासानें पुढें सरसावली. तिनें कितीतरी निरनिराळ्या तऱ्हेचीं पातळें, रेशमी साड्या, तलम कापड, बादला व जरीचें भरतकाम केलेले ब्लाऊज पीसेस त्यांना दाखविले—अगदीं वर्णन करून दाखविले. पोताचा तलमपणा, रंगाचा टिकाऊपणा, सुताची मजबुती व उत्कृष्टता आणि फॅशनचा आजतागाईतपणा इत्यादि गुण अगदीं कसलेल्या कापडविक्रेत्याप्रमाणें वर्णन करून सांगितले. पण फुकट! शेंकडों प्रकार पाहूनहि त्या महाराष्ट्र महिलांनीं त्यांतील कांहीं खरेदी केलें नाहीं.

'आखरे चटणाज ने?' (शेवटीं चटणीखाऊच ना?) तो मनांत म्हणाला, 'यांना इरकली, टिकेकरी जाडजूड लुगडीं पाहिजेत. उंची कपडे हे लोक काय वापरूं जाणत!'

ती तरुणी त्या खरेदी केल्याशिवाय जाणाऱ्या गिऱ्हाइकांकडे व उंची कपड्यांच्या उंच ढिगाऱ्याकडे आळीपाळीनें पहात होती. नोकरीच्या सुरवातीला आपल्या हातून अद्यापि बोहणीसुद्धां झाली नाहीं, या विचारानें ती खिन्न झाली असावी; आणि परत एवढा ढीग व्यवस्थित ठेवायचा, हा विचार नवीनपणामुळें तिला अस्वस्थ करीत असावा, असें त्याला वाटलें. दर्जा आड आला नसता तर मोठ्या आनंदानें

त्यानें तिला मदत केली असती. पण इतक्यांत एक शेजारच्या स्टॉलवरचा नोकर तत्परतेनें तिच्या मदतीला गेला व त्यानेंच त्या ढिगाऱ्याची सारी व्यवस्था लावली, हें पाहून त्याला बरें वाटलें. ती एका साधारण स्टुलावर बसून घाम टिपीत होती. तिला झालेल्या श्रमाची त्याला चांगली कल्पना आली. विजेच्या पंख्याखालीं सुंदर मखमाली कोचावर आरामशीर बसण्याची जिची योग्यता, ती सौंदर्यखनि असल्या भिकार स्टुलावर बसलेली पाहून त्याला वाईट वाटलें. हें तिच्यायोग्य आसन नव्हे. आपल्याला परवानगी मिळेल तर आपण तिला आपल्या हृदयसिंहासनावरच बसवूं! नव्हे, परवानगी देण्याघेण्याआधींच ती त्या स्थानीं बसली आहे!

त्यानें आवेगासरसें हळूच नांव उच्चारलें,

'चंद्रमणी!'

तिनें चमकून त्याच्याकडे पाहिलें, परंतु ती उठली नाहीं. त्यानें मानेनें खूण करून बोलाविलें; तिचाहि उपयोग झाला नाहीं. शेवटीं पुन्हां त्यानें हांक मारली,

'चंद्रमणी!'

ती हळूच उठली आणि मंदगतीनें त्याच्या टेबलाशीं येऊन उभी राहिली. तिचा हंसरा चेहरा लज्जेनें लाल झाला होता. तो सहानुभूतिपूर्वक म्हणाला,

'हें पहा, गिऱ्हाईक आहे तें. कधीं आहे कधीं नाहीं, असं हें व्हायचंच. दहा गठ्ठे दाखवावे, तेव्हां दोन वारांची विक्री होते कधींकधीं. म्हणून असं हताश होण्याचं कारण नाहीं. धंद्यांत कशी चिकाटी पाहिजे. हळूहळू कळेलच तुम्हांला. सुरवातीला होतं असं, जा. मन लावून काम करीत जा.'

तिचें मुख अधिकच आरक्त झालें. घर्मबिंदूंनीं त्यावर मोत्यांची जाळीं चढवून त्याची शोभा वाढविली. तिच्या नाकाच्या पाकळ्या किंचित् स्फुरण पावल्या. ओंठ विलग होऊन मोत्यांसारख्या दांतांची प्रभा फाकली. ती कांहींच बोलली नाहीं. तिच्या नक्षत्रासारख्या चमकणाऱ्या नेत्रांतूनच कृतज्ञता व्यक्त होऊन त्याला प्रत्युत्तर मिळालें. त्यामुळें कधीं न अनुभवलेलें अनिर्वचनीय सुख त्याच्या मनाला, नव्हे हृदयाला-जाणवलें. 'स्वर्ग स्वर्ग म्हणतात तो हाच! आणि निराळा असेल, तर तो यापुढें फिकाच!' असें त्याला वाटलें. कांहीं केल्या त्याच्या दृष्टीची तृप्ति होईना. परंतु आपल्या नवीन दर्जाला साजेसें वागणें त्याला भागच होतें. त्याची इच्छा नसतांहि कामाचा व्याप त्याला तसें करावयास भाग पाडीत होता.

कांहीं वेळानें त्यानें मान वर करून पाहिलें तों ती तरुणी गिऱ्हाईक स्त्रियांना जरी काम केलेलें कापड दाखवीत होती आणि तिच्या पाठमोऱ्या आकृतीकडे पहात प्रत्यक्ष कंपनीचा आणि त्याचाहि मालक उभा होता! त्याची समाधान व्यक्त करणारी स्मितयुक्त मुद्रा पाहून याच्या हृदयाला तीक्ष्ण शस्त्र बोंचल्यासारखें वाटलें. त्याच्या मुठी वळल्या. मालकाच्या जागीं दुसरा कोणी असता तर सभ्य स्त्रीकडे अशा बेमुर्वतखोर दृष्टीनें पाहिल्याबद्दल त्याला त्यानें चांगलेंच बक्षीस दिलें असतें. श्रीमुखांत भडकावून सभ्यतेचा धडा शिकवायला त्याचे हात कसे वळवळत होते; पण येथें निरुपाय होता.

'धनी आणि नोकर. फारच चमत्कारिक नातें. ज्यानें या योग्यतेला चढविलें तो धनी प्रतिस्पर्धी! अरेरे! पैसा! पैसा असला कीं वाटेल तें साध्य होतें. गरिबीसारखें पाप नाहीं हेंच खरें. पण—पण ही सुंदरी इतकी उथळ बुद्धीची असेल का? पैशाच्या चकाकीनें डोळे दिपून वयांतील अंतर तिला दिसणारच नाहीं का? कीं, तिकडे ती डोळेझांक करील! छे, इतका मूर्खपणा तिच्या हातून घडणेंच शक्य नाहीं. गिऱ्हाईक स्त्रियांचें कडें तिच्याभोंवतीं होतें म्हणून बरें; नाहींतर ह्या उल्लू मालकानें तिच्याजवळ जाऊन खात्रीनें कांहींतरी अतिप्रसंग करायला कमी केलें नसतें! शंकाच नको. त्याची मुद्राच सांगते. पण मग मी मात्र धनीनोकराचें नातें कवटाळून धरून स्वस्थ बसलों नसतों! पहा, कसा पण हंसत हंसत विजयी मुद्रेनें माझ्यापुढून निघून जातो आहे! जणूं काय माझें सुखच हिरावून नेतो आहे.'

दुपारच्या सुट्टीच्या जरा पूर्वीच ती घरीं जायला निघाली. अधोवदनानें हळूहळू ती त्याच्यापुढें आली आणि दोन्ही हात जोडून तिनें त्याला नमस्कार केला. कितीपण लाजली ती! गालांची लाली थेट कानांपर्यंत पसरली. तिचे ओंठ जरा हालले. ती कांहींतरी बोलली. बहुधा घरीं जायची परवानगी तिनें विचारली असावी.

त्यानें ती तत्काळ दिली. दुसऱ्या कोणी नोकरानें जर अशी परवानगी मागितली असती तर, आज तो अशा जागीं होता कीं, तेथून चटकन् त्यानें घड्याळाकडे बोट करून, सुट्टीला किती मिनिटें बाकी आहेत असें उलट विचारलें असतें. पण अशा सुंदर तरुणीजवळ वेळासाठीं मारवाड्यासारखी घासाघीस करायची! त्याच्या स्त्रीदाक्षिण्याला शोभण्यासारखें नव्हतें तें! कर्णाच्या औदार्यानें त्यानें तिला परवानगी दिली. परंतु ती गेल्याबरोबर त्याला अस्वस्थता वाटूं लागली. हृदयाचे,

छातीचे ठोके जोरानें पडत होते, पण हृदयाचा पत्ता लागत नव्हता. तिनें जातांनां हंसत हंसत तें चोरून नेलें असावें. शून्य हृदयानें तो काय करणार ? त्याला चैन पडेना. सुट्टी होतांच टांगा करून तो एका जवाहिऱ्याच्या दुकानीं गेला. जणूं काय महत्वाचा सवदा हा आत्तांच झाला पाहिजे असा भाव त्याच्या मुद्रेवर होता.

दुकानदार मोत्यांच्या एका सराचा सवदा एका जोडप्याशीं ठरवीत होता. थोडक्यासाठीं त्यांच्यामध्यें घासाघीस चालली होती. झटकन् पुढें होऊन हा म्हणाला,

'मला सुद्धां मोत्यांचा एक सर घ्यायचा आहे. यांना नको असेल तर हा माझ्यासाठीं ठेवा. मी–मी' पण पुढें त्याला बोलवलें नाहीं. कारण दुकानदारानें त्याच्याकडे अशा आविर्भावानें पाहिलें कीं, जणूं काय तो म्हणत आहे, 'ही खरेदी कशाकरितां तें मीं ओळखलं बरं का !'

आपल्या मनांतील भाव दुकानदारानें ओळखला, हें पाहून त्याला अगदीं संकोचल्यासारखें झालें. दुकानदार म्हणाला,

'काय ! चंद्रकान्त ! लग्नाचं निश्चित ठरलं वाटतं ? छान, छान !'

चंद्रकान्त हंसूं लागला. दुकानदार त्या जोडप्याला म्हणाला, 'आतां पहा बुवा !'

पण त्याला फार बोलावें लागलें नाहीं. ठरलेल्या किमतींत सवदा पुरा झाला.

'अरे, घावरूं नको. दुकानांत काय एकच सर होता ! ते बघ, त्यांतून तुझ्यासाठीं निवड हवा तो.'

दुकानदाराच्या मदतीनेंच त्यानें एक सर निवडला. मधला ओपलचा खडा बदलून त्याऐवजीं माणकाचें नाजूक मंगळसूत्र मध्यें गुंफलें असतें तर बरें असें त्यानें सुचविलें; व सवदा पुरा करण्याच्या वेळीं तसा फरक आपण करून देऊं असें दुकानदारानेंहि कबूल केलें. आपल्या नाजुक गौर गळयांत तो सर घालून हास्यमुद्रेनें आपलें स्वागत करीत असलेली चंद्रमणी त्याच्या अंतःचक्षूंना दिसूं लागली. त्यानें तो सर राखून ठेवायला सांगितलें.

दुपारीं तो जरा आधींच ऑफिसांत गेला. त्याचे डोळे शोधकाचें काम करूं लागले. पण इच्छित वस्तु सांपडेना. चंद्रमणी कामावर आली नव्हती. त्यानें घंटा वाजविली. नोकर धांवून आला. त्यानें त्याला प्रश्न केला.

'बाई आली नाहीं काय ? चंद्रमणीबाई ?'

‘ हा सेट, आल्या आहेत. ’

‘ कुठं आहेत ? ’

त्यानें एका स्थूलदेही प्रौढ स्त्रीकडे बोट दाखविलें. आतां ती गिऱ्हाइकांशीं बोलत होती.

‘ मूर्ख नाहीं तर. ’ तो दांतओंठ खाऊन ओरडला.

पुढचें ऐकायला तो नोकर थांबलाच नाहीं.

चंद्रकान्तानें एका कारकुनाला हांक मारून प्रश्न केला,

‘ चंद्रमणीबाई आल्या नाहींत का ? ’

कारकून बुचकळ्यांत पडला. त्याची ती गोंधळलेली मुद्रा पाहून स्पष्टीकरणार्थ चंद्रकान्त म्हणाला,

‘ आज कापडखात्यांत नेमलेली ती नवी बाई ? ’ वनिता-विभागांतील कपाटाजवळ त्याच स्टुलावर बसलेली ती स्थूलकाय बाई तेथून दिसत होती; तिच्याकडे दृष्टिक्षेप करून तो कारकून म्हणाला,

‘ ती काय ? ’

‘ अँ ! आज ह्या लोकांना झालंय तरी काय ? माझी थट्टा करतात कीं यांचीं डोकींच फिरलीं ! ’ तो मनांत म्हणाला.

नंतर त्याच्याकडे रोंखून पहात तो रागाच्या स्वरानें म्हणाला, ‘ बरं जा. ’

बिचारा कारकून खालीं मान घालून गेला. थोडया वेळानें कांहीं कामासंबंधीं विचारण्याकरितां दुसरे दोन कारकून त्याच्याजवळ आले असतां चंद्रकान्तानें सहजपणें त्यांना विचारलें,

‘ काय हो, आज नेमलेली नवी बाई आली नाहीं वाटतं ? ’

‘ हो, ती काय ? ’

‘ पुन्हा तेंच उत्तर ! या साऱ्यांना आज एखाद्या भुतानें पछाडलें आहे कीं काय ? ’ तो मनाशीं म्हणाला.

त्या सुंदर नांवाचा त्या कुरूप शरिराशीं संबंध जोडणाऱ्या ह्या दुष्टांच्या डोक्यावर हातांतील जड पेपरवेट जोरानें भिरकावून द्यावें असें त्याला वाटलें. तो दरडावणीच्या स्वरानें म्हणाला,

'ही कोण ? सकाळीं कामावर आलेली मुलगी कुठं आहे ?'

एकमेकांकडे अर्थपूर्ण दृष्टीनें पाहून ते हंसले. नंतर शक्य तितक्या नम्रतेनें म्हणाले,

'यांचीच इथं नेमणूक झाली आहे. सकाळीं या हजर झाल्या नाहींत. सकाळीं इथं आली होती ती शेठसाहेबांची मुलगी; कांहीं शिवून घेण्याकरितां आतेबरोबर आली होती.'

विजेच्या स्फोटानें सुद्धां तो इतका चमकला नसता. जोपासलेल्या सुंदर फुलबागेवर आकस्मिक वीज पडून तिचा समूळ नाश व्हावा, तसें त्याला वरील अनपेक्षित उत्तर ऐकून वाटलें. त्याचीं सुखस्वप्नें विलयाला गेलीं. त्याच्या आशेचे मनोरे, त्याच्यासमोर धाडधाड कोसळूं लागले. तो नाश त्याला पहावेना. त्याच्या डोळ्यांपुढें अंधारी आली. त्यानें आपलें डोकें अंमळ दाबून धरलें. कांहीं वेळानें 'बरें वाटत नाहीं' या सबबीवर तो घरीं गेला.

तो इतक्या घाईनें आपल्या खोलींत शिरला कीं, त्याचा नोकर कांहीं सांगत होता त्याकडे त्यानें लक्षच दिलें नाहीं.

त्यानें आपल्या जुन्या कॉटवर धाडकन् अंग टाकलें. नोकरानें आणलेला चहा त्यानें खुणेनेंच नाकारला.

'मालकाची मुलगी! ख-पुष्प! अरेरे, तें माझ्यासारख्याच्या हातीं कसलें येणार! झालें, गेलें, सकाळीं उभारलेले उंच मनोरे दुपारींच धाड्दिशीं धुळीस मिळाले. मालकाची—नवलाख्या मालकाची—मुलगी! बनारस कॉलेजांत दाखल झाली आहे म्हणतात! असें हें रत्न, नव्हे आकाशांतलें नक्षत्र; माझ्यासारख्या सामान्य माणसानें त्याचा अभिलाष धरून काय उपयोग? किती आशेनें तिच्या-करितां मोत्यांचा सर मी राखून ठेवायला सांगितला!

'छे, असे शेंकडों सर अन पेंढीं तिच्या पायाशीं लोळत असतील! याची तिला काय किंमत? पण त्या दुकानदाराचें काय? त्यानें तो सर माझ्याकरितां राखून ठेवला आहे. मींच त्याला ठेवायला सांगितलें! आतां काय त्याचें? मला तो कधींच घ्यायचा नाहीं! आधीं जाऊन दुकानदाराला सर्व सांगून आलें पाहिजे, नाहींतर त्याचें नुकसान व्हायचें!'

कोटटोपी चढवून तो खालीं उतरला. तेव्हां नोकर पुढें येऊन म्हणाला,

'पांच वाजतां इतं येनार हैत शेठ—'

'मरूं दे तुझा तो शेठ! आला तर सांग त्याला मगनलालकडे गेलों म्हणून. असेल गरज तर बसेल!'

मागें वळूनहि न पाहातां तो खालीं उतरला, त्यामुळें नोकरानें पुढें केलेली चिठी आणि 'नव्हं नव्हं, शेठ नव्हं—' असें म्हटलेलें अर्धवट वाक्य कांहीं त्याला कळलें नाहीं. मालकाचा तो विक्षिप्तपणा पाहून नोकरास आश्चर्य वाटलें. चंद्रकान्त तडक त्या जवाहिऱ्याकडे गेला.

'मला तो सर घ्यायचा नाहीं काका!' तो अडखळत अडखळत म्हणाला.

आश्चर्यानें त्याच्याकडे पहात दुकानदार म्हणाला,

'कां, कां?'

मान हलवून तो म्हणाला, 'तूर्त सवड नाहीं.'

'एवढंच ना? असूं दे, घेऊन टाक. पैसे कुठं जातात? येतील पुढं मागं!'

'नको!'

त्याच्यानें जास्त बोलवेना. सकाळपासून अनेक आशा ज्यावर आधारलेल्या होत्या तो पायाच मुळांत ढांसळला, या खिन्न विचारानें त्याच्या स्वरांत कंप आला होता. अधिक बोलल्यास आपलें दुःख व्यक्त होईल, या भयानें त्यानें थोडक्यांत उत्तर दिलें. पण त्याच्या भावनांकडे लक्ष द्यायला दुकानदाराला सवड नव्हती. एक सुंदर बेबी ऑस्टिन शेजारच्या दुकानाशीं थांबून तींतील गिऱ्हाईक याच्या दुकानाच्या पायरीशीं थबकलें होतें. ती एक तरुण मुलगी होती. सवदा ठरत आहे असें समजून जरा थांबली होती. तिच्यावर दृष्टि जातांच दुकानदारानें पुढें होऊन तिचें स्वागत केलें. चंद्रकान्तानें वळून पाहिलें तों काय, ती सकाळची—मालकाची मुलगी त्याच्यामागें उभी! ती हास्यमुखानें त्याच्याकडे पहात होती. पण तिला पाहून आपल्याला आनंद झाला कीं दुःख झालें हें त्याला नीट कळेना. तिच्या नमस्काराला प्रति-नमस्कार करण्याचें भानहि त्याला राहिलें नाहीं. क्षणभर त्याच्या वृत्ति स्तिमित झाल्या. त्याची ती गोंधळलेली मुद्रा पाहून तिला मौज वाटली. हंसत हंसत ती म्हणाली,

'माझी चिठी मिळाली नाहीं वाटतं? पांच वाजतां घरीं जाऊन आलें.'

ती काय म्हणते याचा त्याला नीट अर्थबोध होईना. इकडे येण्यापूर्वीं नोकर कांहीं सांगत होता हें त्याला आठवलें; पण तें कशाविषयीं होतें तें त्याला आठवेना.

त्यामुळें उत्तर काय द्यावें हें न सुचून अगतिकपणें तो तिच्याकडे पहात राहिला. सकाळच्या आणि आतांच्या त्याच्या वृत्तींत कितीतरी फरक झालेला तिला दिसला. सकाळचा उत्साह व प्रफुल्लता लोपून त्या जागीं खिन्नता पसरली होती. तें लक्षांत घेऊन विषयांतर करीत ती पुढें म्हणाली,

‘ हा सर घ्यायचा आहे वाटतं ? छान आहे ! ’

‘ अंहं ! ’ जरा हंसलेंसें तोंड करून त्यानें उत्तर दिलें.

‘ पण आतांच तर तुम्ही सवदा ठरवीत होतां ! ’

दुकानदार मध्येंच म्हणाला,

‘ होय बाईसाहेब, यांनीं आज सकाळीं हा सर आपल्या भावी वधूसाठीं राखून ठेवायला सांगितलं; आणि आत्तां नको म्हणतात ! ’

प्रकरण वाढत चाललेलें पाहून त्याला वाईट वाटलें. निश्चयी स्वरानें तो म्हणाला,

‘ नको, मला घ्यायला सवड नाहीं. ’

‘ सवडीचा काय प्रश्न ! सांगितलं ना ? पैसे केव्हांहि दे. पैसे कुठं पळतात ? पण असा नग मात्र पुन्हा मिळणं कठीण ! ’

तरुणीचा चेहरा गंभीर झाला. ती हलकेंच म्हणाली,

‘ घ्या ना ! पैशाचाच प्रश्न असेल तर ते मी देतें. ’

हा सवदा आतां ठरणारच, ह्या खात्रीनें दुकानदार दुसऱ्या गिऱ्हाइकाकडे लक्ष द्यायला गेला.

तिच्या प्रश्नाला चंद्रकान्तानें थोडक्यांत उत्तर दिलें.

‘ कां पण ? तुम्ही आपल्या पत्नीकरितां घेणार होतां ना ? तिला भेट म्हणून—माझी आठवण म्हणून स्वीकारा. ’

तिचा स्वर जरा कंपित झाला.

‘ माझी पत्नी ? ’

जणूं काय आपल्याशींच तो बोलत होता.

‘ मला पत्नी नाहीं. मला लग्नच करायचं नाहीं. ’

‘ पण सकाळीं तुमचा लग्न करायचा बेत होता ! ’

तो स्तब्धच राहिला. तीच पुढें म्हणाली,

‘ मग आतांच कशानं फिरला ? ’

' माझा नाहीं फिरला. ' तो चटकन बोलून गेला.

' म्हणजे तिचा फिरला ! तिचें नांव व पत्ता कळेल तर कदाचित् मी तिचं मन वळवूं शकेन. '

त्यानें सरळ तिच्याकडे पाहिलें. जणूं काय तिच्या हृदयांतले भाव तिच्या डोळयांतून दिसतील असें त्याला वाटलें असावें. तिचे डोळे चमकले. चेहरा लाल झाला. झटकन् तिची दृष्टि खालीं वळली. तो म्हणाला,

' जिच्यावर माझ्या आशा आधारल्या होत्या, ती माझ्या आटोक्याबाहेरची आहे !'

' कोण ती ? '

' सकाळीं दुकानांत कापडाची विक्री करीत होती, ती ! '

' चंद्रमणी ? '

असें म्हणून तरुणी मोठ्यानें हंसली.

जणूं काय एका वेळीं चारपांच रुपेरी घंटा एकदमच खणखणल्या. त्याच वेळीं दुकानदारानें त्यांच्याकडे येऊन विचारलें,

' मग काय नक्की ठरलं ? घेणार ना ? '

तरुणीनें उत्तर दिलें,

' हो, आत्तांच ठरलं ! '

त्यानें चमकून तिच्याकडे पाहिलें. सराचे वेढे बोटाभोंवतीं गुंडाळीत ती हंसत म्हणाली, ' हं चला, ठरलेल्या नाटकांत हा एक नवीन प्रवेश आम्हीं घातला हें बाबांना सांगूं या. त्यांना फार मौज वाटेल. चला. '

त्याच्याकडे पाहून ती फार मोहकपणें हंसली. हातांतल्या मोत्यांच्या सराशीं तिचे शुभ्र दांत स्पर्धा करीत आहेत असें त्याला वाटलें.

---

## आघात ५

**घाव लागे तुज आणि झालें मी घायाळ । बाई, झालें०–**
**आंसवांनीं भडके हा पेटलेला जाळ । बाई, पेटलेला जाळ !**

चहाची तयारी करीत असतांना आशा वरील चरण गुणगुणत होती. संसारांत नुकतेंच पदार्पण केलेली नवोढा होती ती. चांगला अनुरूप पति मिळाला होता तिला. सर्व सुखसोयींनीं सज्ज अशी लहानशी टुमदार बंगली; गांवांत पाण्याचें दुर्भिक्ष्य असतांहि घरांत व बागेंत सर्वत्र नळाच्या द्वारें पुरविलेलें विपुल पाणी; दररोज वेणी व फुलदाणी शृंगारण्याला पुरेशीं, सुंदर व सुवासिक फुलें मिळण्याइतकी लहानशी आंखीव बाग; लहानशा दिवाणखान्याच्या दाराशीं पिंजलेल्या कापसासारखा शुभ्र केंसाळ, गुबगुबीत कुत्रा; दिवाणखान्यापुढील व्हरांड्यांत एका बाजूला लहानसा झोंपाळा व दुसऱ्या बाजूला वेताच्या चार खुर्च्यांमध्यें राउंड टेबल; व्हरांड्याच्या कठड्यावर दवणा–मरव्याच्या टांगलेल्या कुंड्यांशेजारींच पोपटाचा पितळी पिंजरा.

–अशी तिच्या संसारचित्राची एकंदर पार्श्वभूमि होती; आणि त्या पार्श्वभूमीवर त्या सुखी जोडप्याचें मुख्य चित्रहि फार शोभून दिसत असे. मधुचंद्रानिमित्त दूरदूरच्या सफरी करून तें जोडपें नुकतेंच परत आलें होतें. आशेचा पति डॉ. अशोक हा रेल्वेंत नोकरीस असल्यामुळें हा दूरचा प्रवास त्यांना सुखावह झाला होता. आपणांस दूरदूरचीं प्रेक्षणीय स्थळें पहाण्याचा योग आहे, असें जर तिला लग्नदिवसापूर्वी कुणीं सांगितलें असतें, तर त्यावर तिनें क्वचितच विश्वास ठेवला असता. नव्हे, त्यास तिनें वेड्यांतच काढलें असतें. परंतु आतां पतीसमवेत तो अनपेक्षित प्रवास करून ती आली होती; आणि त्यामुळें तिचें मन फारच प्रसन्न झालें होतें. विशेषतः शहाजहान बादशहाच्या प्रेमाचें प्रतीक–आग्र्याचा ताजमहाल–पाहून तिच्या मनाला अनिर्वचनीय अशा संवेदना जाणवल्या.

पौर्णिमेच्या रात्रीं दुग्धस्रावांत निथळून निघाल्याप्रमाणें पूर्णचंद्राच्या प्रकाशांत तळपणारा तो ताजमहाल पहात असतां तिचा कोमल हात मृदुपणें दाबून तो तिला म्हणाला,

‘ पाहिलंस, हें मुमताज-शहाजहानांचं प्रीतिचिन्ह किती भव्य अन् कसं शुभ्रनिर्मल आहे ! ’

तिचेंहि मन पवित्र भावनांनीं भरून आलें होतें; पण ती बोलूं शकली नाहीं. ती जरा बावरली. संकोचानें सलज्ज खालीं पहात ती स्तब्ध राहिली. तिचें ऊर धडधडूं लागलें. परंतु ती नवोढा असल्यानें तिला संकोच शोभूनच दिसत होता.

घरीं गेल्यावर त्यांचें पुष्कळच बोलणें झालें. तें संभाषण अमुकच एका विषयासंबंधीं होतें, असें नाहीं. 'शहाजहाननें ताजमहाल बांधला तसा एखादा शिवाजीनें कां नाहीं बांधला ?' 'मोंगल बादशहांनीं प्रेममंदिराच्या नांवाखालीं जशा भव्य इमारती उठविल्या तशा मराठ्यांनीं कां नाहीं उठविल्या ?' 'पुरुषांचें प्रेम एकनिष्ठ असतें कीं स्त्रीचें एकनिष्ठ असतें ?' 'एका वेळीं एकीहून अधिक स्त्रियांवर पुरुष प्रेम करतांना दिसतात, तसा प्रकार स्त्रियांच्या बाबतींत असूं शकेल कीं नाहीं ?' असे एक ना दोन, अनेक विषय त्यांच्या संभाषणांत होते. आणि तिनें स्वतःकडे बहुतेक श्रोत्याचीच भूमिका घेतली होती. शेवटीं काल्पनिकांतून वास्तवांत शिरत तो हंसत हंसत म्हणाला,

'खरंच, आशा ! उगाच जिज्ञासा म्हणून विचारतों, तूं कधीं कुणावर प्रेम केलं होतंस का ? कुणाची– निवड !

आशा जरा चमकली. बावरल्या नजरेनें त्याच्याकडे पहात ती म्हणाली,

'चला ! भलतंच कांहींतरी !'

'यांत भलतंच काय ? प्रौढ मुलींच्या आयुष्यांत असं घडणं शक्य अन् अवश्यहि नाहीं काय ?'

'अवश्य आहे म्हणा, पण शक्य मात्र नसतं बहुधा. मुलींना निवड करायची संधि मिळतेच कधीं ?'

'कां बरं ? कितीतरी लोक उपवर मुलींना पाहयला येतात.'

'म्हणून काय ?'

'मुलींनीं योग्य वेळीं तोंड उघडलं–'

'पण तसं जोंपर्यंत होत नाहीं–'

'मग काय, आमची निवड तरी मनास आली आहे कीं, 'पदरीं पडलं, पवित्र झालं' असाच प्रकार झालेला आहे ?'

त्यानें हंसत हंसत विचारलें, तेव्हां तिनें मान वेळून व दोन्ही हातांत तोंड झांकून

सलज्ज हंसत असा कांहीं आविर्भाव केला कीं, या विभ्रमांतच त्याला त्याच्या प्रश्नाचें उत्तर सांपडलें. प्रेमभरानें तिचे मृदु हात हातांत घेत तो पुढें म्हणाला,

'निवड करायची सर्वांना सवड मिळत नसेल कदाचित्; पण भावी पतिसंबंधानें– मुलीच्या कांहीं आकांक्षा, कल्पना तरी असतीलच कीं नाहीं?'

'बरं, मग?'

'त्या कितपत फलद्रूप झाल्या–?'

जरा बावरून गोंधळलेल्या मुद्रेनें तिनें विचारलें,

'म्हणजे काय बाई?'

तिचा हात जरा दाबून तो म्हणाला,

'म्हणजे असं, तूं सुखी आहेस ना?'

मान वेळून ती म्हणाली,

'हें काय बाई कांहींतरीच विचारणं?'

'यांत कांहींतरीच काय?'

'नाहींतर काय? कानांची साक्ष काढायची ती, डोळ्यांवर विश्वास नाहीं वाटतं?'

तिचा तो रुसका आविर्भाव पाहून व मार्मिक उत्तर ऐकून त्याला मौज वाटली. तो मोठ्यानें हंसला. तीहि हंसूं लागली. नंतर धीर धरून सलज्जपणें ती म्हणाली,

'पण आपण? आपण सुखी झालां कीं–? आपलं प्रेम, निवड! पुरुषांचं बायकासारखं नसतं कांहीं. निवड करायला त्यांना पुष्कळ जागा असते, म्हणून–' तिचा तो गोंधळ पाहून व शब्द सोडलेल्या धब्यासारखे प्रश्न ऐकून त्याला फार मौज वाटली. तो हंसत म्हणाला,

'मला सुद्धां यापूर्वी निवड करायला फारशी संधि मिळाली नव्हती. मी मात्र निवडला गेलों होतों एकदां!'

तिच्या मुद्रेवरील उत्कंठित भाव पाहून तो पुढें म्हणाला,

'मुलीकडून नव्हे, तिच्या पालकांकडून!'

'हं! पुढं?'

'पुढं काय? त्यांच्या कांहीं अटी होत्या. असं करावं, अन् तसं वागावं. नाहीं जमलं तें आम्हांला!'

'पण मुलगी काय म्हणाली ?'

'पण मुलींना संधि असतेच कधीं ?' तो हंसत म्हणाला.

'बरं, बरं ! सांगावं ना आधीं ?'

'सांगण्यासारखं कांहीं नाहींच तर सांगणार काय ? तिला मीं पुरती पाहिलीसुद्धां नव्हती; मग भाषण, परिचय कुठला ? एक गोंडस गोरा हात व त्यावर एक डाळिंबी बांगडी, अन् नांव होतं वाटतं तारका. बस्स, आठवतं तें एवढंच सारं ! हातावरूनच कल्पना करायची तर मुलगी सुंदर असावी.' आठवण करून सांगितल्यासारखें तो बोलत होता व ती लक्षपूर्वक ऐकत होती. त्याचें बोलणें थांबतांच ती एकदम म्हणाली,

'अन् ती सुंदर मुलगी आपण पाहिली नाहीं ? शक्य तरी आहे ?'

'कां शक्य नाहीं ? लज्जेचा मक्ता काय बायकांनींच घेतला आहे ? बायकांना आडून पहाण्याची तरी सोय असते; पण भर मंडळींत पुरुषानं समोर पहाणं... अन् त्यांतून आम्ही होतों विद्यार्थी ! अनभ्यस्त दृष्टि वर करायला धीर झाला नाहीं !'

'पुढं ?'

तिच्या गालाला हळूच स्पर्श करून तो म्हणाला,

'कहाणी सांगत नाहीं कांहीं मी !'

'असं काय गडे ! सांगावं ना पुरतं ?'

'सांगण्यासारखं कांहीं नाहींच, तर सांगणार काय ? ऐकिवांत होतं कीं, त्या मुलीची इच्छा फार होती. पण— पण मूर्ख पागल पालक—'

'मग पुढं ?'

तिचा हात मृदुपणें दाबून आश्वासनाच्या स्वरांत तो म्हणाला,

'असूया वाटायला नको कांहीं ! तिचं लग्न तिच्या पालकांच्या इच्छेप्रमाणं एका जाड्या विद्वानाशीं झालं आहे. अर्थात् ती सुखीच असेल.'

तो हंसला. तिला तें हास्य खिन्न वाटलें. तिनें आतुरतेनें विचारलें,

'अन् आपण ? आपण—'

हलुवारपणें तिचा कान पकडून तो हंसत म्हणाला,

'डोळ्यांवर विश्वास बसत नाहीं का ? कानांनींच ऐकायचं आहे ?'

हंसत हंसत आपली सुटका करून घेत ती म्हणाली,

'नको, नको, पुरे आतां.'

त्या प्रसंगानंतर डॉ. अशोकच्या वागणुकींत विशेषच मोकळेपणा आला होता. कधीं सुंदर फुलांचे गजरेच आण, कधीं सुवासिक सेंट आण, कधीं मधुर फळें, तर कधीं जरूर नसतांहि सुंदर कापड, कागदी फुलझाडें, किंवा घरांत लहान मूल नसतांहि सुबक चित्रें, खेळणीं आण; अशा रीतीनें तो आपल्या प्रियतमेला रिझविण्याकरितां झटत होता. आणि आशाहि या बाबतींत मागें नव्हती. त्यानें आणलेल्याच वस्तु, त्याच्या नेत्रांना, मनाला, जिव्हेला व एकंदरींत त्याला आकर्षक, आवडत्या व सुखावह कशा होतील याकडेच तिचें सारें लक्ष लागलेलें असे. जणूं काय, एकमेकांना सुखविण्याच्या बाबतींत त्यांच्यामध्यें स्पर्धाच लागली आहे.

परंतु आशेच्या हृदयाकाशांत मधून मधून थोडेसे ढग जमून येत, आणि तिला अस्वस्थ करीत. मधूनच ती स्वतःचा धिःकार करी. मधूनच तिला वाटे, 'किती मोकळा, साधा, सरळ स्वभाव आपल्या पतीचा ! आणि माझा ? मीं माझं अंतरंग उघडं केलं का ?' तिच्या डोळ्यांसमोर कांहीं दृश्यें उभीं राहात आणि अंग शहारल्यासारखें करून ती मनाशीं म्हणे—

'उंः ! असे कितीतरी लोक मुलींना पाहयला येतात ! त्यांत त्या थेरड्या धनिकाचं काय सांगायचं ? त्यानं पुष्कळ लाळ घोटली अन् आईबापांनींहि पुष्कळ धमक्या दिल्या— पण इथं कुणी डाळ शिजूं दिली त्याची ?'

पण लगेच चलच्चित्रपटाप्रमाणें दुसरें दृश्य दृष्टीसमोर येई. एक उंच, सडपातळ गौर वर्णाचा तरुण. त्याची ती स्मितयुक्त मुद्रा—आणि ते तेजस्वी डोळे, रुंद कपाळ आणि बारीक लांबसडक बोटें !—

'हे भाईचे खासगी शिक्षक.' ती मनाशीं पुटपुटे.

'किती छान शिकवीत ? विषय सुलभ करून देणं हा त्यांच्या हातचा मळ ! पण भाईला त्यांचं काय ? तो आपला त्यांना चुकविण्याच्यामागं नेहमीं असे. मी त्याला बोललें तर चिडून म्हणे, 'तुला एवढं हें वाटतं, तर तूंच शीक त्यांच्याजवळ.' आणि माझा गणित विषय कच्चा असल्याची एकदम मला जाणीव झाली. बाबांची

परवानगी घेऊन मी शिकूं लागलें. किती आस्थेनें शिकवीत मला ते ! शिकविण्याच्या आस्थेपुढं, ठराविक वेळ होऊन गेला, या गोष्टीचं महत्त्व त्यांना वाटत नसे. ते कवीहि होते. किती छान त्यांच्या कविता ? आणि आवाजहि कित्ती गोड ! अन् पुरुष असून लाजवट तरी किती ? त्यांची ती कविता–

**जरि दृढतम अपुली प्रीती । वाटते मनाला भीती । राजसे !**
**मी निर्धन शिक्षक कोठें । तूं धनपति–दुहिता कोठें । राजसे !**
**तव वास मंदिरीं रम्य । तें उटज मात्र मज गम्य । राजसे !**
**जोंवरी प्रीतिची कलिका। उमलली न, तों खुडिसि न कां ? ॥राजसे !**

खसूकन् त्यांनीं कागद ओढून घेतला हातांतून. पण मीं शेवटीं पाहिल्याच या ओळी ! कित्ती हंसलें मी अन् कित्ती लाजले ते ! 'म्हटलं, कोण ही राजस राजकन्या ?' तेव्हां भिंतीवरील आरशाकडे बोट करून ते म्हणाले, 'त्यांत पहा, म्हणजे दिसेल.'

'मला ते आवडत होते. मी त्यांची रोज वाट पहात असें. त्यांना आवडतं, म्हणून मन लावून मी अभ्यासहि करीत असें. पण ही गोष्ट त्या क्षणापर्यंत इतक्या स्पष्टपणें माझ्या ध्यानांत आली नव्हती. त्यामुळं त्यांचे ते अनपेक्षित उद्‌गार ऐकून किती दचकलें मी. काय काय वाटलं मनाला, कांहीं सांगतां येत नाहीं. अशा सुशिक्षित, सद्‌गुणी, सुंदर कलावंतानं आपणास गौरविलं, असं वाटून अभिमान वाटला रूपाचा. अन् कोण जाणे कां, पण रागहि आला जरासा. कोण जाणे तो रागच होता कीं अनुराग ? हें आजहि नक्की सांगतां येत नाहीं. पण कांहींतरी बोललं पाहिजे असं वाटून थरथरत्या ओठांतून उत्तर बाहेर पडलं–'पहा हं. मी आईला सांगेन.' अन् अभ्यासाकडे नेहमी दुर्लक्ष करणारा भाई–त्याचं कसं लक्ष गेलं कोण जाणे ! खरोखरच त्यानं आईला सांगितलं. झालं, बाबांनीं त्याच दिवशीं शिकवणी बंद केली. त्यांच्या कवितेचा शेवटचा चरण–

**जोंवरी प्रीतिची कलिका–**
**उमलली न, तों खुडिसि न कां ? । राजसे !**

'जणूं बोलाफुलास गांठ पडली. स्वप्न पडलं अन् संपलं. झालं ! बाबांनीं जारीनं स्थळं हुडकण्यास सुरवात केली. पुष्कळ प्रयत्नाअंतीं इथं जमलं. त्यांच्यापेक्षां विशेष शिक्षण होतं असं नव्हे. विशेष संपत्ति होती म्हणून. त्यांच्यासारखा

लंगडा गाडा नव्हता, चांगला सुरळीत चालता गाडा होता, चांगली फायदेशीर नोकरी, थोडी वडिलार्जित संपत्ति, यामुळं हें स्थळ बाबांना विशेष पसंत पडलं अन् तसं म्हटलं तर नांव ठेवायला कुठं जागा आहे ? पण–पण माझ्या लग्नाचा त्यांच्यावर किती वाईट परिणाम झाला ? बिचारे ! पुढचं शिक्षण, नोकरी, सारं सारं सोडून कुठं देशोधडीला निघून गेले, कांहीं पत्ता नाहीं. कुणी म्हणतात, त्यांना वेड लागलं. किती हृदयद्रावक बातमी ही !

' एका उमद्या पदवीधर तरुणाचा माझ्यापायीं असा नाश व्हावा ना ? ' अन् त्याच्या दुःखाला कारण होणारी मी ? मी सुखाच्या राशीवर लोळतें आहे, ही गोष्ट मला सारखी बोंचते, अस्वस्थ करते. आणि कशाला मनाशीं प्रतारणा व्हवी ? मनाच्या अगदीं आंतल्या कप्प्यांत अगदीं खोल खोल तरंग उठतात–' इकडची चांगली चलती आहे, अशा सुस्थळीं कुणींहि आपली अप्सरेसारखी मुलगी अगदीं हंसत हंसत दिली असती. माझ्याशिवाय इकडचं अडलं नसतं कांहीं. पण...पण त्या गरीब बिचाऱ्याचं ? त्याच्या आयुष्याचा नाश झाला; त्यापेक्षां त्याच्याशीं–शिव शिव ! असले विचार म्हणजे–सत्य कितीहि ' शिवं सुंदरम् ' असलं तरी इकडं हें कसं सांगायचं ? त्यांनीं आपलं मन सहज मोकळं केलं. पण माझ्या अंतरंगाच्या तळाशीं असा गाळ ! कसा दाखवायचा त्यांना ?

' द्रौपदीचं लक्ष एकदां कर्णाकडं गेलं, त्यामुळं पडलेलं जांभूळ पुन्हा झाडाला चिकटेना तिच्या हातून, अशी एक हरिदासी दंतकथा ऐकली होती मीं. पण ती आतां आठवली, म्हणजे कसा थरकांप होतो जिवाचा ! दया, केवळ दया, त्यांच्या शोचनीय परिस्थितीबद्दल अनुकंपा ! पण इकडच्या जिवावर दुसऱ्याच्या सुखदुःखांचा विचार करणं, अनुकंपेनं विव्हळणं आणि तें सारं दडवून ठेवणं...किती भयंकर दिव्य आहे हें ? अरेरे ! प्रतारणे, प्रतारणेसारखं पाप नाहीं ! तेंच कां नेमकं यावं माझ्या वांट्याला ? '

शाळेंत शिकत असतांना एकदां गिरीश कवींचें काव्यगायन तिनें ऐकलें होतें. त्यांची ' तेढ ' ही कविता तींतील भावनाकुल शब्दांमुळें तिला फारच आवडली होती. इतकी कीं, त्या कवितेच्या कांहीं ओळी तेव्हांच तिच्या तोंडीं बसल्या होत्या. एकदां ऐकलेली ती कविता, अर्थात् क्रमवार म्हणतां येत नव्हती; पण ज्या ओळी फार आवडल्या त्या तेव्हांच पाठ झाल्या होत्या. आणि लग्न झाल्यावर

आतां घरांत एकटी असतांना, कामधाम करतांना; आपल्या गोड, भावनानुकूल आवाजानें अगदीं तन्मयतेनें ती त्या गुणगुणत असे. त्या हलुहलु आपल्याशीं गात असतांना तिच्या मनाला अनिर्वचनीय अशा संवेदना जाणवत असत. कांहीं ओळी म्हणतांना आनंद होई, तर कांहीं म्हणतांना उदासवाणें वाटून निःश्वास बाहेर पडत. असें कां होतें हें विचारायला सुदैवानें कोणी जवळ नसे; पण कोणीं विचारलें असतें तर त्याचीं कारणें तिला सांगतां आलीं असतीं कीं नाहीं शंकाच आहे !

कदाचित् एखादा कलावंत चित्रकार, चित्रगुप्ताप्रमाणें अदृश्य राहून तिच्या मुखावरील भाव चित्रित करता, तर निरनिराळ्या भावनांच्या सुंदर दर्शनाला जग मुकलें नसतें.

आजहि ती चहा करीत असतांना गुणगुणत होती. स्टोव्ह सुरू असल्यामुळें जरा मोठ्यानेंच ती गात होती—

**किती पाहूं वाट तूझी लागे जिवा वेड । बाई, लागे जिवा०**
**अजूनी कां नाहीं गेली अंतरींची तेढ ।**
**व्याकळून गेलें सख्या । काय देऊं मोल । बाई, काय देऊं०**
**ऐकूं येतील कां कधीं दिल्रुब्याचे बोल ।**
**दिल्रुब्याचे बोल । बाई, दिल्रुब्याचे बोल ।**

शेवटच्या ओळीच्या सुरवातीला तिनें स्टोव्ह बंद केला. भिंतीवरील हातमोरींतील चकचकीत तोटी फिरवून हात धुतले, पुसले व 'घाव तूज लागे आणि......' हें कडवें ती पुन्हा सुरू करणार होती, इतक्यांत केंसांवरून हात फिरवीत तिनें सहज भिंतीवरील मोठ्या आरशांत डोकावलें, तों एकाऐवजीं दोन चेहरे ! लज्जेनें ती लाल झाली. तिच्या गुणगुणण्याचे शेवटचे सूर हवेंत तरंगत असतांच कोणत्याहि दिलरुब्यांतून उमटणार नाहीं असा एक ध्वनि तिच्या कानांत उमटला. तो ऐकायला तिच्या मुखावरील आरक्तता कानापर्यंत धांवून आली. तिचा देह व स्वर कंपित झाला. कृत्रिम कोपानें ती म्हणाली,

'हें काय ? केवढ्यांदा दचकलें मी !'

'आप्पलपोट्या माणसाला अशीच शिक्षा पाहिजे. असं छान गातां येत असून, चांगलं येत नाहीं म्हणालीस, नाहीं का ?'

'कसलं छान ? गुणगुणतें झालं आपलं कांहींतरी ! '

'पण तें कांहींतरी आम्हांला ऐकवावं कीं नाहीं? कशांतलं पद आहे हें?'

'गिरीशांची तेढ!'

भुवया संकुचित करीत तो म्हणाला,

गिरीशांची तेढ? हें काय प्रकरण आहे बुवा!'

'गिरीश कवीचं नांव नाहीं का माहीत? त्यांची एक कविता.'

'नांव ठाऊक आहे, पण कविताबिविता कांहीं मी जाणत नाहीं! आमचं काव्य म्हणजे शस्त्रास्त्र!'

तिनं अंग शहारल्यासारखें केलें. तोच पुढें म्हणाला,

कापाकापीचा आडदांढ धंदा. पण असं जरी असलं, तरी कोमलता फार आहे धंद्यांत. हलुवारपणाशिवाय कामच व्हायचं नाहीं हें. नुसती काव्यं करून काय? हलुवारपणानं दुसऱ्याची आधिव्याधि दूर करणें हें सुद्धां कलेचंच कौशल्य आहे.'

'खरं, पण जरा श्रमाचं, जोखमीचं अन् घाणेरडंच काम हें, नाहीं का?'

त्यानें नकारार्थी मान हालवून हंसत तिच्याकडे पाहिलें. ती म्हणाली,

'आपण आर्ट्‌सकोर्स मधेंच सोडून इकडे कां वळलांत?'

आपल्या रुंद कपाळावरून हलुहलु बोटें फिरवीत स्वतःशीं बोलल्याप्रमाणें तो म्हणाला,

'कां वळलों? आवड म्हणून.'

'आपण इकडं वळायला नको होतं!'

त्यानें चमकून विचारलें,

'कां?'

तीहि चमकून हंसली आणि म्हणाली,

'उगीच.'

'हंः! उगीच! खरंच इकडं वळलों नसतों, तर आज मी कोणीतरी निराळाच माणूस झालों असतों.'

चहाचा ट्रे घेऊन आशा त्याच्याजवळ येत होती, पण त्याची दृष्टि कांहीं शोधीत असल्यासारखी दूर कुठेंतरी लागली होती. त्याच्या उद्गारांत आर्तता आहे व त्याची दृष्टि जीवनांतील अपूर्णाकडे खिन्नतेनें पहात आहे अशी एक कल्पना तिच्या

डोक्यांत क्षणैक चमकून गेली. ट्रे टेबलावर ठेऊन कपांतील चहा चमच्यानें ढवळीत तिनें विस्मयानें विचारलें,

'निराळं ? म्हणजे काय बाई ?'

'म्हणजे ? म्हणजे इंग्लंडला गेलों असतों. एखाद्या जिल्ह्याचा कलेक्टर झालों असतों. कदाचित् दिवाणसुद्धां झालों असतों !'

हें शेख महंमदी मनोराज्य ऐकून आशेला हंसूं आलें. मोठ्यानें हंसत ती म्हणाली,

'मग छान झालं असतं.'

'हं, पण मग मात्र खात्रीनं माझं लग्न तारकाबाईशींच झालं असतं !'

सर्जरीच्या कपाटांतील लखलखीत तीक्ष्ण शस्त्राची धार आपल्या काळजाला भेदून गेल्यासारखें तिला वाटलें. विव्हलतेनें झटकन् तिनें आपले दोन्ही हात छातीजवळ नेले. त्याच क्षणीं तिच्या हातांतील चहाचा सुंदर कप खालीं पडून फुटला, आणि त्याचे लहान लहान असंख्य तुकडे त्या दोघांमध्यें पसरले !!

# पराचा पारवा

६

त्यांना जाऊन कांहीं वर्षसुद्धां झालें नसेल; त्यांच्या भलेपणाचें, चांगुलपणाचें व खेळाडू वृत्तीचें स्मरण त्यांच्या मित्रमंडळींच्या स्मृतींत अद्यापि ताजें होतें, तसेंच करडेपणाचेंहि ! कित्येक चिरस्थायी स्वरूपाचीं लोकोपयोगी कृत्यें या करडेपणाचा अवलंब करूनच त्यांनीं केलीं होतीं आणि आतां तीं हितपरिणामी ठरल्यामुळें इतरेजनांच्या मनांतहि त्यांच्याविषयीं आदराचें स्थान दृढ झालें होतें. त्यांनीं पुन्हा बदलून यावें आणि त्यांच्या संगतींत व त्यांच्या नियंत्रणाखालीं आपणांस वागायला मिळावें असें त्यांच्या मित्रमंडळींना व इतरेजनांना मनापासून वाटत होतें.

परंतु तो दिवस मोठा चमत्कारिकच उजाडला. त्या दिवशीं कँपाच्या बाजूला बॉंबगोळ्यासारखी एक बातमी येऊन आदळली, तिचा स्फोट सर्वत्र ऐकूं आला. अनपेक्षितपणामुळें ऐकणाऱ्यांच्या वृत्ति एकदम स्तिमित झाल्या. मित्रमंडळींना वाटलें कीं ' आपण ऐकलं तें ठीक, पण दुसऱ्या कुणास कळूं नये. ' परंतु तसें कुठलें व्हायला ! मांजराच्या चोरपावलांनीं ती बातमी सर्वत्र जाऊन पोंचलीच ! वाऱ्याला प्रतिबंध कोण कसा करणार ? मग ही तर वावटळ. हिनें सर्वत्र गडबड उडवून दिली.

जो तो सखेदाश्चर्य व्यक्त करूं लागला. आडूनआडून आणि दुरूनदुरून, अस्पष्ट शब्दांत जो तो आपली नापसंती, आश्चर्य व अविश्वास व्यक्त करूं लागला.

जणूं काय असें होऊं नये, पण कसें झालें, असेंच ज्याला त्याला वाटत होतें. त्यानंतर दोनतीन दिवसांनीं ती बातमी रावबहादुरांच्या कानांवर आली. त्यांना तर धक्काच बसला ! दुसऱ्या दिवशीं सकाळीं उशिरां उठण्याचा आपला सूर्यवंशी बाणा सोडून ते आधीं रावबहादुर दिवाणबहादुरांच्या बंगल्यावर आले, तों ते अद्यापि उठलेच नाहींत असें त्यांना कळलें.

' किती आळशी लोक हे ? सूर्य एवढा वर आला. उन्हामुळें नव्हे, तर आगडोंब अशी बातमी कळून त्या बातमीमुळें आपणांस ताप होत आहे आणि हे आपले खुशाल आळशासारखे बिछान्यावर लोळत पडले आहेत ! उन्हं पडलीं तरी

माणसांना बिछान्यावर रहावतं तरी कसं म्हणतों मी ?' त्या क्षणीं स्वतःचा दिनक्रम विसरून रायबहादुर स्वतःशींच पुटपुटले. नंतर ते चपराशाला म्हणाले,

'उठव त्यांना. म्हणावं मी आलों आहें !'

ते दोघे समवयस्क मित्र. त्यांचें ठीक होतें, पण चपराशाला आपलें मरण कळत होतें. त्यानें 'जी हाँ' म्हटलें व इकडेतिकडे पंधरा मिनिटें काढलीं. नंतर चहा आणून ठेवीत तो म्हणाला—

'आप चाय लीजिये. साब अभी आ रहे हैं.'

याचा अर्थ रायबहादुरांना चांगला कळला. मूठ आपटून ते म्हणाले, 'डॅम धिस् ! अभी बुलाव.' त्यांच्या डोळ्यांचा विस्तार, मुद्रेचीं भयानकता आणि हावभाव पहायला तो थांबलाच नाहीं.

दिवाणबहादुर उठून एकदांचे खालीं आले व औपचारिक हस्तिदंती झाल्यावर रायबहादुरांच्या मुद्रेंत विशेष फरक पडला आहे असें पाहून हलक्या आवाजांत म्हणाले, 'आपण आज असे कां ? कांहीं कळेल ?' नंतर त्यांचा बाहू हलवीत व चिरूट पुढें करीत ते सहास्य म्हणाले,

'हं ! आखीर मामला क्या है ? बोलो तो !'

त्यांच्या हास्यविनोदाकडे दुर्लक्ष करून रायबहादुर म्हणाले–

'मोठी वाईट बातमी ऐकली आज. मुंबईहून ते भाईसाहेब आगलावे सकाळीं आले आणि आल्याबरोबर त्यांनीं ती मला सांगितली !' आणि ती जी कांहीं वाईट बातमी होती, ती रायबहादुर दिवाणबहादुरांच्या कानांत सांगते झाले. कारण मोठ्या लोकांच्या घरीं भिंतीलाहि कान असतात.

ती बातमी ऐकून अविश्वासाच्या स्वरानें दिवाणबहादुर म्हणाले,

'छेः ! शक्यच नाहीं.'

'अहो, माझंहि मत असंच आहे, पण त्यांनीं प्रत्यक्ष आपल्या डोळ्यांनीं पाहिलं म्हणतात. मला सुद्धां प्रथम खरं वाटेना. पण त्यांनीं डोळ्यांनीं पाहिलं म्हटल्यावर–ते खोटं कशाला बोलतील ?'

'असं म्हणतां ? पण आपला नाहीं बुवा विश्वास बसत !'

अहो, माझासुद्धां नसता बसला दुसऱ्या कोणीं सांगितलं असतं तर–'

'मग आतां ?

'आतां काय ? ही सुधारणा, हे सुधारणेचे चाळे !" नंतर सुधारणा व सुधारणेचे चाळे या विषयावर त्यांचें कितीतरी बोलणें झालें. भाषणाला जोर येण्यास चहाचिरुटांचा फन्ना उडाला आणि शेवटीं आपणांस कळलेली बातमी कोणालाहि न सांगण्याची सूचना एकमेकांस देऊन त्यांनीं एकमेकांचा निरोप घेतला.

संध्याकाळीं क्लबांत त्यांची गांठ पडली तेव्हां कोणीहि दोन माणसें हलक्या आवाजांत बोलतांना आढळलीं, कीं तीं तीच वार्ता एकमेकांस सांगत आहेत असें दोघांनाहि वाटे. त्या विषयावर पुन्हा चर्चा करण्याकरितां ते दोघेहि दिवाणबहादुरांच्या घरींच आले.

रायबहादुर म्हणाले, 'तुम्हीं कोणाला सांगितली तर नाहीं ना ती गोष्ट ?'

'छे हो, सांगेन कसा दुसऱ्या कोणाला ! ' फक्त आमच्या यांना सांगावी लागली. त्यांनीं आमच्या तोंडावरूनच ताडलं–'

'मलाहि घरीं सांगावी लागली; सांगणार नव्हतों, पण त्या कसल्या वस्ताद ! 'कांहीं तरी विशेष आहे, सांगाच !' असा आग्रह धरल्यावर सांगणं भागच पडलं.'

'हं! मग त्यांचं काय मत पडलं ? खरं वाटलं का त्यांना ?'

'नाहीं. खरं नाहीं वाटलं; पण असं झालं तर आश्चर्य नको वाटायला असें त्या म्हणाल्या.'

पुढें झुकून उत्सुकतेनें दिवाणबहादुर म्हणाले—

'कां कां ? कशावरून ?'

'त्यांचं म्हणणं असं, कीं त्या सुखी नव्हत्या !'

'त्यांचं पटत नव्हतं, होय ना ? हं ! आमच्या ह्यांचंसुद्धां असंच मत पडलं !'

'पण कशावरून ? आम्ही तर त्यांना फार सुखी समजत होतों.' रायबहादुर.

'अहो आपलं वरवरचं पहाणं. पण बायका महा वस्ताद असतात. या बाबतींत त्यांची दृष्टि फार बारीक आणखी खोल असते.' दिवाणबहादुर.

'खरंच, खरंच ! आपण वरवरच पहात असतों; पण आमच्या ह्यांनीं सांगितलं तेव्हां पटलं.' रायबहादुर.

'बिचारी एवढी शिकलीसवरलेली पण पिंजऱ्यांतल्या मैनेसारखी आयुष्य कंठीत होती म्हणतात ! अन् हे आपले गाणंबजावणं, क्लब अन् ब्रिज यांत गर्क !' दिवाणबहादुर.

‘ खरंच, खरंच बिचारी ! आयामोलकरणी अन् शिपाईगड्यांत वेळ घालवायची !’ रायबहादुर.

‘ हें तिच्या विद्वत्तेचं चीज ! मग कशी नाहीं चीड येणार तिला ? ’ दिवाणबहादुर.

‘ अहो, चीड ?–कधीं कधीं रडकुंडीस यायची ती ! आमच्या ह्या सांगत होत्या ना–‘ रडकुंडीस यायची अगदीं ! ’ रायबहादुर.

आमच्या ह्या तर म्हणाल्या—असं होईल अशी आपली केव्हांच खात्री झाली होती, पण उगाच वाच्यता कशाला ? म्हणून नाहीं बोलंल्या. त्यांची आया यायचीच ना आमच्याकडे; ती बोलली होती वाटतं. मागं त्यांचं भांडण झालं, तेव्हां आपण असं करूं असा तिनं स्वच्छ इषाराच दिला होता म्हणे. ’ दिवाणबहादुर.

‘ तुमच्या या बोलण्यानं मीं ऐकलं त्याला दुजोराच मिळतो आहे. मींसुद्धां असंच ऐकलं होतं अगदीं. पण आपलं मन निर्मळ. असल्या घाण बातम्या ऐकून त्यावर विश्वास ठेवायला तयार नसतं. अन् त्यांत त्यांचं वर्तन किती सोज्ज्वळ ! त्यामुळं फसगत झाली हो. पण तें सारं त्यांचं दिखाऊ वागणं होतं असं आत्तां कळलं !’ रायबहादुर.

आपल्याला कळलेल्या त्या अनिष्ट बातमीबद्दल पराकाष्ठेची गुप्तता राखणें अवश्य आहे असें वाटून आपापसांतहि ते तिचा स्पष्ट उच्चार न करतां तासन् तास मोघमच बोलत. घरींदारीं हलक्या आवाजानें चर्चा करीत. कोणी जवळ आलें असतां इषाऱ्यानेंच स्तब्ध रहाण्याची एकमेकांस सूचना देत. एवंच, गुप्तता राखण्याचा इतका आटोकाट प्रयत्न करीत, कीं त्यामुळें सहजच लोकांना वाटे, कीं ज्या अर्थी हीं बडीं धेंडें इतकी गुप्तता राखीत आहेत, त्या अर्थी ही बातमी केवळ वाऱ्यावर उडून आलेली नव्हे. तिच्या मुळाशीं कांहीं गुप्त गड्डा खचित असला पाहिजे. ‘ मित्रापासून रक्षण कर ’ अशी एक उक्ति आहे. या बाबतींत ती किती सार्थ आहे हें या मित्रद्वयाच्या कृतीवरूनच चांगलें व्यक्त झालें. त्यांच्या फाजील दक्षतेमुळें फायदा होण्याऐवजीं त्या बातमीची परिस्फुटता होऊन जिकडेतिकडे चर्चा मात्र चालू झाली, कीं ‘ विनोदिनीदेवींनीं घटस्फोट करून घेतला व लौकरच त्या पुनर्विवाह करणार—मुसलमानाशीं करणार. ’

रायबहादुर व दिवाणबहादुर दोघेहि अगदीं दिङ्मूढ होऊन गेले. ते आपापसांत म्हणत, ‘ आपण दोघेहि त्या दोघांचे मित्र. त्यांच्याविषयीं आपल्याला आपलेपणा

वाटतो. त्यांची बेअब्रू ती आपली असं समजून आपण जों जों या गोष्टीवर पांघरूण घालतों तों तों ती जास्तच उघडी होत आहे. आहे काय हा प्रकार? आपला दर्जा ओळखून कोणी तोंडावर बोलला नाहीं आपल्याला; पण पाठीमागं अन् नकळतपणाचा आव आणून मुद्दाम चर्चा करतात अन् त्यांना आणि आपल्यालाहि हंसतात सारीं.'

'खरं, पण या थरापर्यंत साऱ्या गोष्टी त्यांना कळल्या तरी कशा?' रायबहादुर.

'हं! तेंच विचारतों मी!' दिवाणबहादुर.

'आपण कितीतरी गुप्तता ठेवतों.' रायबहादुर.

'हो, पण बातम्या कशा पसरतात?' दिवाणबहादुर.

'मला वाटतं हें बायकांचं काम.' रावबहादुर.

'शक्य आहे. पण मीं तर आमच्या घरीं सक्त ताकीद दिली होती!' दिवाणबहादुर.

'आणि मीहि!' रायबहादुर.

'अन् तरी वणवा पसरला आहे!' दिवाणबहादुर.

'अहो, पण करणार काय? मुंबईहून बातम्या येतात ना! आमची छोकरी सांगत होती–' रायबहादुर.

'काय सांगत होती?' दिवाणबहादुर.

'तिच्या शाळेंतल्या त्या... ह्यांच्या मुलीनं म्हणे चौपाटीवर तिला त्याच्याबरोबर हातांत हात घालून फिरतांना पाहिलं. आणि सिनेमागृहांतहि पाहिलं! आमची मुलगी म्हणत होती, बाबा कसं हो असं हें म्हणून.' रायबहादुर.

'हं, पोरीसोरींनीं सुद्धां तिची चर्चा करावी हें असह्य वाटतं मला. माझं तिच्यावर मुलीसारखं प्रेम होतं. किती भाबडी अन् बालिश!' दिवाणबहादुर.

'खरं आहे.' रायबहादुर.

'कांहीं कांहीं पदार्थ तिच्या किती आवडीचे होते! विशेषतः तेलाचे–'

' अहो दिवाणबहादुर, तुमचे ते तेलाचे पदार्थ तूर्त राहूं द्या बाजूला. हा तेलाचा शिडकाव तूर्त थांबवा कसंहि करून. ' रायबहादुर.

' खरंच. काय बरं करतां येईल ? प्रत्यक्ष लिहून कांहीं विचारतां येणार नाहीं; जाऊन प्रत्यक्ष पहाणं हाच एक उपाय आहे. पण इतक्या दूर कोणत्या निमित्तानं जायचं ? अन् मामला खरंच बिघडलेला असला तर आपलं आगंतुक जाणं आगींत तेलासारखंच व्हायचं. ' दिवाणबहादुर.

' अहो, तें राहूं द्या तूर्त. इथला बकवा थोडा बंद करतां येईल तर पहा ! '

' हो हो, तें करतां येईल सहज. आपला तो रावसाहेब काय करतो आहे ? ' दिवाणबहादुर.

प्रश्नार्थक मुद्रेनें रायबहादुर पहातच राहिले. दिवाणबहादुरच पुढें म्हणाले– ' त्यानं स्वतः कांहीं करायला नको. आंतून आंतून खालपर्यंत हुकूम सोडायचे. अहो, चार माणसं एकत्र जमतात तिथं खाकी डगला दिसला म्हणजे पुरे आहे. वाच्यता थांबली ! बस्स एवढंच. ''

' चला तर त्यांच्याकडे जाऊं या. ' रायबहादुर.

ही दुकल जेव्हां रावसाहेबांकडे गेली, तेव्हां ते घरीं नव्हते. त्यांच्या पत्नीनें सांगितलें, ' ते तेलाची व्यवस्था करायला गेले आहेत. '

ह्या दुकलीच्या तोंडून एकदमच आश्चर्योद्गार निघाला !–

' ऑं ! तेल ?–कसलं ? '

' गोडं तेल ! विनोदिनीदेवींची ' तेल पाठवा ' म्हणून तार आली आहे. त्यांच्या बहिणीचं लग्न आहे तिकडं, त्या निमित्तानं दक्षिणी पद्धतीची मेजवानी द्यायची आहे त्यांना. तिकडं तेल मिळत नाहीं चांगलं भजींबिजीं करायला, म्हणून इकडून मागवलं आहे. आणि हा पहा त्या दोघांचा फोटो ! याचं लहान लॉकेट करून मंगळसूत्रांत गुंफून धाडायचं आहे. '

' अरे ! ' दोघेहि एकदमच उद्गारले.

त्यांना वाटलेलें आश्चर्य त्यांनीं मुद्रेनेंच व्यक्त केलें.

शेवटीं रायबहादुर म्हणाले, ' ह्या तर हुबेहूब विनोदिनीच आणि ( हलक्या अवाजांत ) हा मुसलमान ?–'

'नाहीं, ही त्यांची बहीण नीलांबरीदेवी आणि हे प्रो. राजालिलियन ! उड्‌दूचे प्रोफेसर ! तिकडे निजाम-हैद्राबादेस असतात. यांचं आतां लग्न होणार. कापडचोपड शिवून घ्यायला अन् दागदागिन्यांची खरेदी करायला दोघंहि राहिलीं होतीं मुंबईस; पण हें मंगळसूत्र गुंफून घ्यायचं मात्र विसरून गेलीं !'

मिसेस रावसाहेबांचा खुलासा ऐकून दोघांहि मित्रांनीं एकमेकांच्या हातांवर टाळी देऊन ते आनंदानें दाबले.

त्यांच्या मनांत एकदमच विचार आला– 'काय चमत्कारिक जग आहे हें ? कसा पराचा पारवा करतं एकदम !'

आणि ते हंसत हंसतच बाहेर पडले.

# चन्द्रा 

चंद्रभागा तिचें नांव. फारशी सुंदर नव्हती ती. अरुंद कपाळ, जाड भुवया, बारीक डोळे व गोबरे गाल, हीं कांहीं सौंदर्याचीं लक्षणें नव्हत. परंतु हंसरी मुद्रा व सुदृढ प्रकृति आणि चपल वृत्ति यामुळें ती आकर्षक दिसे. कोणतेंहि काम करण्याची तयारी, समजून घेण्याची उत्सुकता व चलाख स्वभाव या गुणांमुळें कोणाचेंहि लक्ष ती वेधून घेई.

परंतु चंद्रा मोठी दुर्दैवी पोर होती. तिचे आईबाप लहानपणींच वारले होते, आणि गुजराथेंत असलेल्या एका चुलत्याकडे ती वाढत होती. तिचा वडील भाऊ दुसऱ्या चुलत्याकडे मुंबईस होता व सर्वांत वडील बहीण पुण्यास सासरीं होती. अर्थात् मुलांच्या आईबापांचा अशेष संसारपसारा मुंबईच्या चुलत्याच्या संरक्षणाखालींच होता. चंद्राच्या भावाची शिक्षणांत फारशी गति न चालल्यामुळें त्याला गिरणींत नोकरी धरावी लागली; व कांहीं दिवसांनीं तो मोठा झाला म्हणून त्याचें लग्नहि झालें.

तिकडे लहानगी चंद्राहि वाढून मोठी झाली. चुलत बहिणीबरोबर तिचें साधारण लिहिण्या-वाचण्याइतपत शिक्षण झालें व मूळच्याच चलाख मुलीला टापटिपीचें चांगलें वळण लागलें. तिच्या खाण्यापिण्याची आबाळ नव्हती. तिचें आयुष्य मजेंत चाललें होतें. परंतु तिच्या दुसऱ्या चुलत्यास तिची काळजी वाटूं लागली. कारण चंद्राचा भाऊ आतां लग्न झाल्यावर आपल्या बापाचा संसार घेऊन वेगळा झाला होता, आणि चुलत्याचें म्हातारपण जवळ आल्यामुळें निर्वाहाचें कांहीं चांगलें साधन हुडकून काढणें त्यास जरूर होतें. त्यानें भाऊस—चंद्राच्या भावाचें नांव—सांगितलें "अरे, तूं आपल्या सुखाच्या संसारांत दंग आहेस. आणि तो (दुसरा चुलता) तिकडे कानांत तेल घालून बसला आहे, पण जननिंदा ऐकवत नाहीं मला. पोरकी पोर! लग्नाची वाढली; मला झोंप कशी येईल? तो काय आपल्या पोरींचीं लग्नं टाकून चंद्राचं आधीं करील? उलट तिला मागणं आलं तर आपलीच पोर पुढं करील. नाहीं रे बा; आईबापावेगळ्या पोरक्या पोरीचं लग्न लावून दिल्याशिवाय मला नाहीं चैन पडणार. जा तिला घेऊन ये, मी स्थळ शोधून ठेवतों."

हा बेत त्याला बराच वाटला. काय नेम? थोरल्या चुलत्यानें नाहीं केलें तिचें लग्न तर मग? आपल्यावर पडूं पहाणारी जबाबदारी आयती धाकटे काका

घेताहेत, या आनंदानें तो चंद्राला आणायला गेला. काका असे धाडायचे नाहींत, म्हणून बायकोच्या आजाराचें निमित्त केलें; आणि बहिणीस आणून धाकट्या चुलत्याच्या स्वाधीन केलें.

चंद्रा चांगली सुदृढ मुलगी होती, थोडासा पैसा व थोडीशी खटपट यांच्या सहाय्यांनें तिला चांगला वर मिळणें अशक्य नव्हतें. पण मग काकाची तरतूद होणें शक्य झालें नसतें. त्यांनीं महामेहनतीनें एक अलौलिक स्थळ शोधून काढलें ! ज्याचे पुत्र-कलत्र सर्व कांहीं असून हिंदूंच्या सोळा संस्कारांपैकीं विवाह हा संस्कार न झाल्यामुळें ज्यास जातिबहिष्कृत केलेलें होतें, अशा एका प्रौढ-पोक्त गृहस्थास पावन करून घेण्याकरितां या गंगेची योजना झाली. या सौद्यांत काकांनीं फक्त ५०० रौप्यमुद्रिका मोजून घेतल्या. झालें ! पतितास पावन करणें एवढेंच गंगेचें काम तें झालें. दोघांचें कुवारपण फिटून धर्माचें रक्षण झालें, चंद्रभागेशीं विवाह झाल्यामुळें ते गृहस्थ पंगतीस पावन ठरले, आणि मग कांहीं त्यांना तिची जरूर नव्हती. कारण त्यांचें कुटुंब मोठें असून तिच्या वयाच्या मुली त्यास होत्या. चंद्रा भावाकडे परत आली. त्यालाहि कामाला माणूस हवेंच होतें. हातावरचें पोट असलेल्या अपुऱ्या प्राप्तीच्या माणसास केवळ अन्नावारी राबायला हक्काचें माणूस मिळालें तरी तें महागच वाटतें ! पण हा भूर्दंड त्यानें मोठ्या उदार मनानें सोसला.

बिचारी चंद्रा ! १०×१० च्या खोलींत भावाचा संसार थाटला होता, त्यांत तिची भर पडली. एक छोटेंसें कपाटाचें खोकें मध्यें उभें करून त्या खोलीचे स्वयंपाक घर, माजघर असे दोन भाग केले होते. चुलीच्या बरोबर समोर एक लहानशी मोरी होती तेंच स्नानगृह. मधल्या दोरीवर एक धोतर सुकत लावलें कीं, चांगला आडोसा होई. परळच्या भागांतील चाळींतली तळमजल्यावरील कोंपऱ्यावरची खोली होती ती. चंद्राचे दिवस तेथें गुजरत होते. तिला रात्रंदिवस चुलीचाच आसरा होता. स्वयंपाक करतांना धग व रात्रीं झोंपतांना ऊब, चुलीजवळ बसण्याकरितां जो हातभर चौरस ओटा होता—तीच तिची उशी. दिवसभर पाणी सांडून व पोतेरें घालून ओल आलेल्या व खळगे पडलेल्या कोब्याच्या जमिनीवर चटई टाकून, मोरीकडे पाय करून ती झोंपत असे. दिवसभर धुणेंपाणी करून गारठलेले पाय मोरीजवळच्या ओलीनें अधिकच वळत. उलट दोन्ही वेळां चुलीकडे तापलेलें डोकें, चुलीच्या

उबाऱ्यानें अधिकच उबे. पायांना उबाऱ्याची जरूर असतांहि उसें बदलणें उचित नव्हतें. कारण मोरीकडील बाजू सखल असल्यानें एका निराळ्या उशीची जरूर लागली असती. शिवाय मोरीकडे तोंड करून निजणें आरोग्याच्या दृष्टीनें विघातक ठरलें असतें. आणि मर्यादा संभाळणें हें देखील तितकेंच जरूरीचें होतें. कारण पलीकडे कपाटाच्या आडोशानें तयार केलेलें माजघर ऊर्फ बैठकीची जागा हेंच तिच्या भावाचें शयनगृह होतें.

आपल्याच वयाची आपली भावजय पलीकडे सुखनिर्भर निजली आहे, तिचा शांत श्वास किंवा प्रेमाची कुजबुज ऐकूं येत आहे, अशा वेळीं चंद्रा आपल्या भवितव्याचा विचार करीत आंतल्या आंत गुदमरत असे. आपणांस सुख नाहीं; पण आपल्या हुंदक्यांनीं किंवा कुशी बदलण्यानें आपली जाग त्या जोडप्यास दाखवून त्यांचा विरस करणें तिला पाप वाटे. पण उलटपक्षीं हें सोसणेंहि तिच्या जिवावर येई. आपल्या अंधःकारमय जीवनाचें मुकें दुःख प्रेमाच्या शब्दावर तिनें सोसलेंहि असतें. पण—?

अपुरें तेल, निगा कांहीं नाहीं, तरी चंद्राचे केस अगदीं हेवा करण्यासारखे दाट व लांबसडक होते. दुपारच्या वेळीं एकुलत्या एक खिडकींतून येणाऱ्या उन्हाच्या तिरपीनें किंवा वाऱ्याच्या झुळकीनें, नहालेले केंस वाळविण्याकरितां मोकळे सोडून ती जर कधीं कुठें गज असलेल्या खिडकींत बसली कीं, झालेंच. भावजयीनें बोलून घ्यायचें, भावाचे कान भरायचे व तिला मार देववायचा. चंद्रा चांगली संस्कारी व साक्षर होती. मोठ्या चुलत्याकडे असतांना तिनें बरींच नीतिपर पुस्तकें वाचलीं होतीं. इतर कुमारिकांप्रमाणेंच तिनेंहि आपल्या मनःफलकावर आपल्या भावी जीवनाचें सुन्दर रेखा–चित्र कल्पनेच्या कुंचल्यानें चित्रित केलें होतें. तें अशा रीतीनें छिन्नविछिन्न झालें असतां, जखमेवर मिठाच्या शिंपणासारखी अशी ही वागणूक तिला असह्य वाटूं लागली.

तरुण काजग्रा जीव, एवढें उभें आयुष्य अशा फुफाट्यांत कसें कंठायचें? तिच्या पुढें प्रश्न होता. तिला ‘मनोरंजन’चें ब्रीदवाक्य आठवलें. ‘यत्र नार्यस्तु पूज्यन्ते रमन्ते तत्र देवताः’ ‘आपण दुर्भागी असून यांना भारभूत आहोंत म्हणून हे आपणांस असें वागवतात. आपण आपल्या पायांवर उभें राहिलें पाहिजे. म्हणजे काय बरं केलं पाहिजे? योग्यता वाढविली पाहिजे. कशानें? शिक्षणानें–पण तें शिक्षणच कसं मिळवायचं?’

एका प्रश्नापाठोपाठ अनेक प्रश्नचिन्हें तिच्या मनांत उभीं राहिलीं. ‘ सत्य-संकल्पाचा दाता भगवान् ’ दुसरें ब्रीदवाक्य. आपण सद्धर्मानें वागत असतां आपली अशी दशा कां ? ती गोंधळली. या साऱ्या प्रश्नांचा उलगडा करून घेण्याकरितां, तिनें (कै.) मित्रांची भेट घेण्याचें ठरविलें. कारण त्याकाळीं स्त्रियांच्या चळवळींचा पुरस्कार करणारें, स्त्रियांना संदेश व स्फूर्ति देणारें, स्त्रियांचा गौरव करणारें ‘ मनोरंजन ’ हें एकमेव मासिक होतें व कै. मित्रांच्या संपादकत्वाखालीं तें चालत होतें.

मोठ्या मिनतवारीनें मुंबादेवीला जाण्याची परवानगी मिळवून ती ‘ मनोरंजन ’च्या ऑफिसांत जाऊन मित्रांना भेटली. आपली करुण कहाणी त्यांना सांगितली. शिकून पायांवर उभें राहाण्याची इच्छा दर्शविली; व मोठ्या लीनतेनें या कामीं त्यांचें साह्य याचिलें. कै. मित्र तरी काय करणार ? त्यांनीं कांहीं पुस्तकें व थोडे पैसे देऊं केले. अर्थात् ही मदत कायमची नव्हतीच. तेव्हां तिचा स्वीकार करून चंद्राचा फायदा होण्यासारखा नव्हता.

आपणास शिकून स्वावलंबी व्हायचं आहे व त्यास भावाचा कसा विरोध आहे, ही सारी परिस्थिति तिनें त्यांच्यासमोर उभी केली. अल्पवयी व विवाहित मुलीला पालकांविरुद्ध मदत करणें म्हणजे कायद्याच्या कचाट्यांत सांपडण्यासारखें आहे; याकरितां आपला कसा निरुपाय आहे, व या बाबतींत कोणी कांहीं करूं शकतील तर ते एक प्रो. कर्वेच करूं शकतील; असें त्यांनीं तिला सांगितलें.

“ कर्वे कुठं भेटतील ? ”

“ हिंगण्याला. ”

चंद्राला भूगोलाचें ज्ञान फक्त गायकवाडीराज्याच्या चतुःसीमा ओळखण्याइतकेंच होतें. तिनें हिंगण्याची नीट चौकशी करून घेतली व पुण्यास गेल्याशिवाय गत्यंतर नाहीं असें तिनें मनाशीं ठरविलें. तिनें आपल्या बहिणीस पत्र लिहून ‘ आपण कंटाळलों आहोंत, तरी चार दिवस घेऊन जाण्याविषयीं विनविलें. बहिणीचें बाळंतपण जवळच आलेलें असून घरांत लहान लहान मुलें होतीं. लहान असली तरी सख्खी बहीण—मायेचें माणूस—अशावेळीं जवळ असली तर बरें अशा विचारानें हा अर्ज तावडतोब मंजूर होऊन चंद्राचे पाय पुण्यास लागले.

चौकस चंद्रानें कान व डोळे उघडे ठेवून सभोंवार पाहिलें. बहिणीच्या घराजवळ एक सभागृह होतें. तेथें वारंवार सभा-संमेलनें होत. शिकलेसवरलेले लोक तेथें एकत्र जमत, त्यांच्याकडे आशाळभूतपणें चंद्रा पाहात राही. त्यांतील कांहीं स्त्रियांशीं तिनें ओळख करून घेऊन—त्यांच्याकडून हिंगण्याची माहिती करून घेतली. शिवाय बहिणीची सेवाशुश्रूषाहि तिनें खूप मन लावून केली. बाळंतपणांतील पथ्यपाण्याची, तान्ह्या मुलाला रात्रीं सांभाळून बहिणीला रात्रीं निवांत झोंपूं देण्याची व दोन्ही वेळां चूल संभाळून इतर मुलांचीहि व्यवस्था नीट ठेवण्याची चांगली खबरदारी घेऊन तिनें बहिणीची मर्जी संपादन केली. नंतर एके दिवशीं तिनें हळूच आपल्या शिक्षणाची गोष्ट बहिणीपाशीं काढली. बहीण तर थक्कच झाली. आपल्यासारख्या गरिबीच्या घराण्यांतील व समाजाच्या खालच्या थरांतील एका परित्यक्त तरुण मुलीनें असली गोष्ट बोलावी याचें तिला सखेदाश्चर्य वाटलें. उलट शिक्षणांत पुढारलेल्या पुण्यासारख्या शहरांत, एका प्रमुख सभागृहाशेजारीं अनेक वर्षें राहात असलेल्या आपल्या बहिणीच्या विचारसरणीचें चंद्राला आश्चर्य वाटलें. बहीण म्हणाली,

"बाई ग, हे पांढरपेशांचे चोंचले! आपल्याला नकोत ते! तुझं भविष्य आतां ठरून गेलं आहे. वाटलं इथं राहा, वाटलं भावाकडे राहा. पोटाला दोन वेळां अन्न व जाडंभरडं वस्त्र असलं म्हणजे झालं. तें न द्यायला आम्हीं कांहीं आजच भिकारी झालों नाहीं. यापेक्षां अधिक तुला काय पाहिजे कीं, त्यासाठीं तुला शिकलंच पाहिजे? हातपाय चारी, कामाला धड असले तर एक पोट भरायला कांहीं कठीण नाहीं, समजलीस?"

झालें. काय बोलणार बिचारी! तिची तळमळ अधिकच वाढली. तिच्या नवीन परिचयापैकीं स्त्रियांनीं तिला हिंगण्याप्रमाणेंच 'शारदासदन'चीहि माहिती दिली होती. थोडासा कायदाही तिला कळला होता. 'आपणांस १८ वर्षें पुरीं झाल्यावर आपण स्वतंत्र व्यक्ति होऊं व हिंगण्याला जाऊन शिकूं. कोणी आपणाला अडविणार नाहीं.' हा एक आशेचा किरण तिला धीर देत होता. तरी तिला स्वास्थ्य नव्हतें. तिची अवस्था व तळमळ पाहून तिच्या बहिणीला वाटलें कीं, हिला कांहींतरी परमार्थाच्या मार्गाला लावावी, आणि याकरितां तिला केडगांवास नेऊन नारायणमहाराजांच्या पायांवर घालण्यांत आलें. परंतु तें वातावरण चंद्राला मानवलें नाहीं.

'शारदासदनां'तील एका मुलीशीं तिनें ओळख करून घेतली; व तेथें केव्हांहि आश्रय मिळून शिक्षण होईल असें तीस कळलें. परंतु ती काय ख्रिस्ती लोकांची संस्था, तिथें मुली बाटवतात, असा प्रवाद ऐकून तिनें पुढें पाऊल टाकलें नाहीं.

एके दिवशीं मोठा धीर करून तिनें हिंगण्यास पलायन केलें. तेथील व्यवस्थापकांची भेट घेतली व आपणास दाखल करून घेण्यास विनविलें.

पालकांची प्रस्तावना नाहीं. चांगल्या वर्तणुकीचें शिफारसपत्र नाहीं. तरुण एकाकी मुलगी, दाखल तरी कशी कोण करणार ? चंद्रा म्हणाली,

" माझी इच्छा आहे. फार इच्छा आहे. मी काबाडकष्ट करीन. एकच वेळ जेवीन. मला दाखल करून घ्या. मला शिकवा. या संस्थेचं नांव ऐकून इथवर मोठ्या आशेनें आलें आहे. दूर लोटूं नका. "

संस्थेंतील मंडळी साशंकपणें तिच्याकडे पाहूं लागली. एकमेकांकडे चकितपणें पाहूं लागली. त्यांनीं तिची हकीकत विचारून घेतली. त्यांचीं हृदयें द्रवलीं. परंतु तिला दाखल करून घेणें त्यांना योग्य वाटलें नाहीं. त्यांनीं तिला सांगितलें कीं,

" विवाहित आहेस तर नवऱ्याची किंवा परित्यक्ता आहेस तर पालकांची संमति व चांगल्या वर्तणुकीबद्दल दोन सभ्य गृहस्थांचा दाखला आण, म्हणजे दाखल करून घेऊं. "

" अहो, पण मी पळून आलें आहें ! "

" काय पळून ? "

" होय हो, शिकण्यासाठीं—"

" ही संस्था म्हणजे तूं काय समजतेस ? अशा मुलीला इथें दाखल करून घेतां येत नाहीं; जा, घरीं जा. "

तिनें पुष्कळ गयावया केलें; पण व्यर्थ. संध्याकाळ होत आली आहे. लवकर न गेल्यास वाट चालायला अडचण पडेल; तरी तिनें लवकर परत जावें असें तिला सांगण्यांत आलें. बिचारी पोर ! डोळे पुशीत निराशेनें निघाली. तिच्या आशेचा एकुलता एक किरण मावळला व भविष्यकाल काळयाकुट्ट ढगांनीं भरून गेल्यासारखें तिला वाटलें. ती चालली असतां, फिरून परत आलेल्या मुलींच्या

घोळक्याजवळ आश्रमांतील कांहीं मुली तिच्याकडे बोट दाखवून बोलत असलेल्या तिला दिसल्या. तिच्या कानीं शब्द पडले ते असे:

“ अग पंढरपूर समजून आली आपली इथं ! अनाथ बालिकाश्रम म्हणजे जसं काय अशा स्त्रियांचं आश्रयस्थान वाटलं तिला ! ”

बिचारी चंद्रा ! तिला वाटलें आणखी एखादी अशी संस्था पंढरपुरास आहे कीं, तिथें कदाचित आपणास आश्रय मिळेल. मोठ्या आशेनें मुलींच्या घोळक्याकडे जाऊन तिनें चौकशी केली. चौकशीअंतीं तिला जें समजलें, त्यायोगें तिला फारच दुःख झालें. विशेषतः इतका वेळ ही सारी मंडळी आपणाकडे साशंक दृष्टीनें कां पाहात होती हें कळून तर तिला आणखीच वाईट वाटलें. जड पावलांनीं व डबडबलेल्या डोळ्यांनीं ती तेथून निघाली. एरंडवण्याजवळ येऊन ती वाटेच्या कडेला बसली व मुक्त कंठानें रडूं लागली.

इतक्यांत त्या वाटेनें एक छकडा घडघडत घडघडत आश्रमाकडे जाऊं लागला. आश्रमांतील मंडळींना रात्रौ सोबत करण्याकरितां ‘ अण्णा ’ त्या छकड्यांतून चालले होते. तिन्हीसांजच्या वेळीं आडवाटेला बसलेली स्त्री-आकृति पाहून अण्णांनीं छकडा उभा केला, व पांढरे धुवट कपडे घातलेली अण्णांची श्यामलमूर्ति खालीं उतरली. त्यांना आपणांकडे येतांना पाहून मुलगी घाबरली व पळूं लागली. आपल्या खणखणीत आवाजानें तिला थांबण्यास सांगून ते तिच्याजवळ गेले व तिला धीर देऊन तिची सारी हकिकत त्यांनीं सहानुभूतीनें ऐकून घेतली. शेवटीं मुलगी म्हणालीः—

“ आतां घरीं जातां येत नाहीं. इतका वेळ घराबाहेर न विचारतां राहिलें, घरचीं माणसं शोध करीत असतील. घरीं गेलें तर तीं मला कुठं होतीस म्हणून विचारतील; अन् जीव तोडून खरं सांगितलं, तरी त्यांना खरं वाटायचं नाहीं. संस्थेचं अन् कर्व्यांचं नांव ऐकून मोठ्या आशेनं इथवर आलें, पण दुर्दैवी मी ! शेवटीं आश्रय मिळाला नाहीं. आतां जीव दिल्याशिवाय किंवा खिस्ती झाल्याशिवाय गत्यंतर नाहीं. ”

अण्णांनीं तिच्या पाठीवर हात फिरवून तिला धीर देत ते म्हणाले, “ चल बाळ माझ्याबरोबर. संस्थेचा दरवाजा तुला उघडा आहे ! मी काय तें सोशीन. पण संस्थेच्या दारांतून अशा मुलीनें विन्मुख परतणं मला असह्य होईल. ” त्यांनीं

तिला छकड्यांत बसविलें व आपण पायीं चालूं लागले. ज्याच्या बाह्य स्वरूपाला व खणखणीत आवाजाला प्रथम आपण भ्यालों ती श्यामलमूर्ति अण्णा कर्व्यांची आहे हें त्या मुलीला तेव्हां कळलें व त्यांची कीर्ति आपण ऐकत होतों ती खरी असल्याचें प्रत्ययास येऊन तिचें हृदय भरून आलें.

पुढें रीतीप्रमाणें तिच्या भावावहिणींस तिच्याबद्दल कळविण्यांत आलें; परंतु कोणी तीस नेण्यासहि आलें नाहीं, किंवा कोणत्याहि प्रकारें अगत्यहि दाखविलें नाहीं. नातेवाईकांनीं तिचा संबंध सोडला, परंतु तिच्यासारख्या समदुःखी अनेक भगिनींशीं तिचें प्रेमाचें नातें जडलें.

× × ×

आपल्या समाजांत अशा कितीतरी चंद्रा आहेत. त्यांपैकीं बऱ्याच जणींचें जीवित, बुद्धि व शक्ति एऱ्हवीं मातीमोल झाली असती. ती प्रो. अण्णासाहेब कर्वे आपल्या संस्थांच्या द्वारें कारणीं लावीत आहेत हे त्यांचे स्त्रीजातीवर केवढे उपकार आहेत!

ईश्वर त्यांस आयुरारोग्य देवो!

---

## गुलाबी कोडें ८

'सुलभ मनिं गणा न भूपसुता' हा चरण स्वतःशीं घोळूनघोळून सुलभा म्हणत होती. इतक्यांत तिनें पोस्टमनचा शब्द ऐकला व ती धावतच दारीं गेली. टपालाचें पुडकें हातीं पडतांच मोठ्या उत्साहानें उद्गारली, "ओहो! किती किती मासिकंन् पत्रं हीं! लेखसुद्धां बरेच आलेले दिसतात!"

टपाल चाळीत चाळीतच ती आंत येत होती. अर्थात् 'सुलभ मनिं गणा न भूपसुता' हा चरणहि गुणगुणतच होती. इतक्यांत आक्कांचा स्वर कानीं पडला.

"सुलभा, इकडं आण बरं टपाल!"

त्यांच्या स्वरांत किंचित् तीक्ष्णता होती; पण टपाल खालवर करण्यांत सुलभा गर्क असल्यामुळें तिच्या ती लक्षांत आली नाहीं. पत्रांतील एक गुलाबी पाकीट वर धरून ती म्हणाली,

"आक्का! हें पत्र पाहा. पत्त्यावरचं अक्षर कसं छान छान आहे. अन् पाकिटाला मंदसा सुवाससुद्धां येतोय वाटतं!" तिनें नाकाजवळ धरलेलें तें पत्र आक्कांनीं झटकन् तिच्या हातांतून ओढून घेतलें आणि एकदा त्यावर दृष्टि फिरवून तें डाव्या हातांत तसेंच ठेवलें. इतर पत्रें वाचून आणि मासिकें मेजावर ठेवून नंतर तें पत्र त्यांनीं फोडलें. कोण जाणे कां, पण तें पत्र कोणाचें आहे हें जाणण्याची सुलभेला फारच इच्छा झाली. तिनें हळूच विचारलें,

"कुणाचं पत्र आक्का?"

"कुणाचं नाहीं. खाजगी आहे माझं!"

आक्कांचें हें अनपेक्षित आणि चमत्कारिक उत्तर ऐकून सुलभा स्तिमितच झाली. आक्का चांगल्या सुशिक्षित होत्या. सार्वजनिक कामांत भाग घेऊं लागल्यापासून त्यांना अनेक संस्थासमित्यांचीं पत्रें, निमंत्रणें येत असत. शिवाय त्यांचें मासिक—त्या स्त्रिया व मुलींकरितां एक मासिक चालवीत होत्या—त्या मासिकाचाहि पत्रव्यवहार बराच मोठा होता. परंतु त्यांत 'माझं खासगी' असें कांहीं नव्हतें. उलट संस्थांचीं निमंत्रणें, मैत्रिणींचीं—सहकारिणींचीं पत्रें व लेखिकांचें लिखाण सर्व मोठ्या आवडीनें व अगत्यानें त्या सुलभेस दाखवीत, तिचें मत विचारीत. एखादें लिखाण अगर त्यांतील एखादें

महत्त्वाचें विधान प्रौढ मुलींच्या आधुनिक दृष्टीनें कसें योग्यायोग्य आहे हें अजमावण्याकरितां त्या आपल्या कॉलेजांत शिकत असलेल्या धाकट्या बहिणीशीं—सुलभेशीं—संधि मिळाल्यास चर्चा करीत; किंवा पत्रद्वारें तिचें मत विचारीत. असें असतां आज त्याच आक्कांचें हें उत्तर ऐकून सुलभेच्या मनाला आश्चर्याचा जरा मोठाच धक्का बसला. त्यामुळें ती स्तब्ध बसली असतां आक्काचा मुलगा श्री भेटीदाखल आलेल्या मासिकांवर झडप घालण्याकरितां तेथें आला. आईच्या हातांत मोहक गुलाबी लिफाफा पाहून त्यानेंहि प्रश्न केला.

" आई, कोणाचं ग पत्र ? "

" तुझ्या कामाचं नाहीं, जा. " आक्कांनीं थोडक्यांत उत्तर दिलें. सुलभेप्रमाणेंच त्यालाहि जरा नवल वाटलें आणि तो अधिक हट्ट धरील हें जाणून सुलभेनें पुढें येऊन हट्टी श्रीला सांगितलें, " श्री, कुणाचीं पत्रं त्याच्या इच्छेविरुद्ध वाचण्याचा हेका धरूं नये बरं का. चल, हें घे तुला ' स्त्री '. मी ' ज्योत्स्ना ' घेतें. चल आतां बाहेर. "

अशा रीतीनें तिनें श्रीची समजूत काढल्यामुळें आक्कांचें समाधान झालें. पण तिच्या मनाला बरें वाटलें नव्हतें. आक्कांचा विश्वास संपादण्याकरितां हें तिचें वरपांगी वागणें होतें. खरें म्हणजे तें पत्र कोणाचें नी काय हें जाणण्याची तिची जिज्ञासा फारच वाढली होती. आक्का तिची वडील बहीण असून विधवा होत्या. त्यांचें वैवाहिक जीवन सुखावह झालेलें नव्हतें, तशा स्थितींतहि त्यांनीं पोरक्या सुलभेचा प्रतिपाळ केला होता. तिचें शिक्षण आणि पुढील व्यवस्था इत्यादींस पुरेल इतका पैसा तिच्या वडिलांनीं तिच्या नांवावर ठेविलेला होता; परंतु तो आपल्या व्यसनी नवऱ्यापासून वांचविणें व अजाण बहिणीला संरक्षण आणि शिक्षण देणें या गोष्टी त्यांनीं फार परिश्रमपूर्वक केल्या होत्या, हें सुलभा जाणत होती. आपल्यावर अपत्यनिर्विशेष प्रेम करणाऱ्या आक्कांना ती बालपणापासून ओळखीत होती आणि म्हणूनच चाळिशी उलटून पन्नाशीजवळ वेगानें जाणाऱ्या आक्का कधीं नव्हे त्या आज ' खाजगी ' म्हणून एक पत्र तिच्यापासून दडवीत होत्या.

या घटनेचें तिला परमावधीचें आश्चर्य वाटूं नये तर काय वाटावें? आक्कांविषयीं पूर्ण आदर वाटत असूनहि तें पत्र पाहण्याची—वाचून पाहाण्याची तिला दुर्दमनीय

इच्छा झाली आणि ती सफल करून घ्यायला तिला फारसे परिश्रमहि करावे लागले नाहींत.

एके दिवशीं आक्का बाहेर गेल्या असतां तिनें तो गुलाबी लिफाफा शोधण्यास प्रारंभ केला आणि एकाच्याऐवजीं तसले दोनतीन लिफाफे तिच्या हातीं लागले. म्हणतात ना, "चोरून ऐकण्याचा धंदा, कानीं पडे आपलीच निंदा.' तशीच गत झाली. त्या पत्रांत आक्कांच्याबद्दल अनिष्ट वार्ता नसून तिच्याबद्दल एक शुभ घटना घाटत होती. तिच्या लग्नाच्या भद्रेश्वरीला सुरवात झाल्याचें तिला त्या पत्रा-वरून कळून चुकलें आणि हें कळल्यावर ती आक्कांवर इतकी चिडली, कीं न भूतो न भविष्यति. तिनें आपल्या मनाला आगळ घालण्याचा थोडा प्रयत्न करून पाहिला; पण व्यर्थ ! तिला आक्कांचा अपराध मुळीं क्षम्यच वाटेना. ती मनाशीं म्हणाली,

"काय ! मी भाजीपाला आहें, कीं गायबीय आहें ? माझं लग्न—नी मला न कळवतां साऱ्या खटपटी ? इतक्या गुप्तपणानं कारवाया चालल्या आहेत, तेव्हां खासच कांहीं अनिष्ट प्रकार असला पाहिजे. दुसरं काय असणार ? श्रीमंत स्थळ आहे म्हणे; तेव्हां कांहीं तरी फायदा करून घ्यायचा असेल आपल्या डबघाईस आलेल्या संसाराचा नी मासिकाचाहि ! पण म्हणावं, मी कांहीं भाजीमुळा नाहीं असा माझा विक्रय करायला ! चांगली कॉलेजांत शिकतें आहें, पूर्ण मुखत्यार झालेली आहें आणि अशी कांहीं तुझ्या अंगावर पडलेली नाहीं. वडिलांनीं ठेवलं आहे पोटापुरतं माझ्या. शिक्षण पुरं करीन नी राहीन माझी मी स्वतंत्र. सगळ्यांनीं लग्न करावं असं कांहीं शास्त्र नाहीं ! पुरुष जातीचा मला एवढा तिटकारा असतां आणि आपलं स्वतःचं लग्न सुखावह झालेलं नसतां माझ्यावर हा जुलूम अं ! एका वयांत आलेल्या सुशिक्षित कुमारीवर ! स्त्रीदास्यविमोचनाचा चंग बांधून तशी जाहीर घोषणा करणाऱ्या एका संपादिकेकडून ! जग दुटप्पी आहे हेंच खरं ! त्याचे दाखवायचे दांत निराळे असतात नी खायचे निराळे ! "

संध्याकाळीं आक्का घरीं आल्या तेव्हां वरील विचारांची फैर त्यांच्यावर अनपे-क्षितपणें झाडली गेली. त्यांनीं पुष्कळपरींनीं तिची समजूत घालण्याचा प्रयत्न केला, कीं या प्रकरणीं तुझ्या मर्जीविरुद्ध तुझ्यावर सक्ति करण्याचा बिलकुल उद्देश नाहीं. तूं तिकडे कॉलेजांत होतीस. सुट्टींत घरीं येणारच होतीस. मलाहि पुरेशी माहिती मिळवायची होती. ती मिळतांच विचार करण्यासारखं स्थळ आहे असं माझ्या

मनाला पटल्यास तुझ्यापुढं ही बाब ठेवणारच होतें; नाहींतर सोडून देणार होतें. उगाच तुझ्या मनांत नसत्या विचारांची लाट कशाला इतक्यांतच उत्पन्न करा. अशा विचारानं मीं तुला सांगितलं नाहीं. पाहिलंसना ? पत्रांत कांहीं विशेष आहे का ? ''

पण सुलभेची समजूत पटली नाहीं. "मी बी. ए. झाल्याशिवाय लग्नाचा विचारहि करणार नाहीं, हें माहीत असतां ही उठाठेव तूं केलीसच कां ? नी केलीस तर माझ्यापासून गुप्त राखलीस कां ? " हाच मुद्दा एखाद्या वितंडवाद्याप्रमाणें ती घेऊन बसली आणि विचाराचा बंध सुटून मनुष्य एकदां विकाराच्या आहारीं गेलें कीं मग त्याच्या आचाराची मजल कुठवर जाईल याचा नेमच नसतो ! सुलभा तावातावानें बोलत होती.

"मला ठाऊक आहे. तुझा माझ्यावर विश्वासच नाहीं. लहानपणापासून मला हें पक्कं ठाऊक आहे ! जरा कुठं शाळेंतून यायला वेळ झाला, कीं पाठवलाच गडी ! जशी काय मी कुठं पळून जाणार होतें ! गड्यावर तेवढा विश्वास ! बहिणीवर नाहीं ! त्याच वृत्तीची सुधारून वाढवलेली ही आवृत्ति ! तिकडे मी कॉलेजमध्यें असणार, काय करीन नी काय नाहीं ? नव्हे, संधि मिळाली की नेमकं वाईटच करणार ही भीति. त्यापेक्षां अडकवावी कुणाच्या तरी गळ्यांत नी व्हावं धन्य ! पण लक्षांत ठेव, मी मेजर झालें आहें, नी कोणावर अवलंबून राहाण्याचं मला कारण नाहीं.

"अग, अग सुभा, काय बोलतेस हें ? तुझ्यावर माझा पूर्ण विश्वास आहे. गडी पाठवीं हें खरं; पण तें एक बुझगावणं म्हणून बरं. अग, चांगल्या फळांचा माकडांनीं नाश करूं नये म्हणून बागेंत बुजगावणं नाहीं का ठेवीत ? तसं दुर्जनां-पासून तुला कांहीं त्रास होऊं नये यासाठीं मला गड्याचं बुझगावणं उभं करावं लागे. तेव्हां तूं लहानहि होतीस, तरी तुझ्यावर विश्वास होता नी आहे. पण दुर्जनांवर नव्हता, त्याला काय करूं ? माया वेडी असं म्हण पाहिजे तर ! ''

पुढें त्यांच्यानें बोलवेना. उद्वेगानें त्या गप्प बसल्या. पण सुलभेचा पारा फारसा खालीं उतरला नाहीं. तिनें जवळच्या गांवीं आपल्या एका मैत्रिणीकडे जाऊन तेथून एखाद्या ट्रिपला जाण्याचा आपला निश्चय जाहीर केला आणि बहुतेक तेथूनच आपण परस्पर कॉलेजला जाऊं असाहि बेत तिनें जाहीर केला ! आक्कांना मनस्वी खेद झाला

" यंदा आपल्या मासिकाचा खास अंक काढावयाचा आहे. त्याची जुळवाजुळव तुझ्या साह्यानं करायची आहे–" हीं सबब त्यांनीं पुढें केली, त्यावर आपण प्रवासांतहि तें काम वेळेवर करूं, असें तिनें आश्वासन दिलें. झालें ! अधिक ओढून धरण्यांत कांहीं हशील नाहीं असें दिसतांच त्यांनीं मूग गिळले.

सुलभा मैत्रिणीकडे गेली खरी; पण आपण आपल्या बहिणीशीं भांडण करून बाहेर पडलों हें न जाणों मैत्रिणीला कळेल या भीतीनें तिला तेथें दोनतीन दिवसांवर राहावेना. 'खाई त्याला खवखवे,' या म्हणीप्रमाणें आपण कॉलेजला सुट्टी होतांच घरीं आलों नाहीं तोंच बाहेर पडलों, याचा मैत्रिणी झाल्या तरी काय अर्थ करतील ? पुष्कळ विचारांतीं तिला सुचलें कीं आपल्या मासिकाचा पुढें निघणारा खास अंक सर्वांगसुंदर करण्यासाठीं साहित्य व वर्गणीदार मिळविण्याकरितां या सुट्टींत फिरण्याचें आपण ठरविलें आहे असें सांगावें. सहसंपादिका म्हणून आपलें नांव मासिकावर आहेच. तेव्हां सुट्टीचा उपयोग करणें हें आपलें कर्तव्यच आहे.

आणि ही छान समर्पक युक्ति सुचल्याबद्दल तिला आनंद झाला आणि ती अमलांत आणण्याचा तिनें निश्चयहि केला.

× × × ×

ठण-ठण-ठण–! घंटा झाली, गाडी आली, थांबली. दारांची उघडझाप झाली. कांहीं उतारू उतरले, तसेच कांहीं गाडींत चढले. याच वेळीं गाडीच्या विरुद्ध दिशेकडून तारेचें कुंपण ओलांडून सुलभा आपल्या मैत्रिणींसह लगबगीनें गाडीकडे येत होती. बरोबर मैत्रिणीचे दोन भाऊहि होते. तरुणांचा पोषाख अगदीं साधा– ओपन कॉलरचे व दुमडून आखूड केलेल्या बाह्यांचे अंगरखे व पायघोळ विजारी–घरगुती होता. मुलींचाहि तसाच साधा व स्वच्छ पेहेरवेश होता. त्यांचें संभाषण हसत मजेंत चाललें होतें. तथापि सुलभा आपला लांब शेपटा सावरीत झपझप चालत होती. पोषाखावरून वरील मंडळी रेल्वेजवळ राहाणारी व म्हणूनच हटकून शेवटच्या घंटकेला स्टेशनवर येणारी होती असें अनुमान करायला हरकत नाहीं.

गार्डाच्या डब्यापुढून एकदोन डब्यांपर्यंत ती मंडळी गेली नाहीं तोंच गाडी हालली आणि या मंडळीची धांदल उडाली. सुलभेनें तर एक बारीकसा चीत्कारच केला. तरुणांनीं हात वर करून हवेंत रुमाल उडवीत 'स्टॉप' म्हटलें. इतर

लोकहि हात वर करून ' हो हो ' म्हणूं लागले. पण गाडीच्या तें गांवींहि नव्हतें. ती आपली सावकाश पुढें जातच होती. त्यांच्यापुढें जो डबा आला तो अगदीं प्लॅटफॉर्मच्या खाली होता. घाईघाई करून त्या मंडळींनीं सुलभेला आंत चढविलें. भराभर होल्डऑल, पेटी, बॅग, तांब्या, डबा वगैरे सामान गाडींत कोंबलें म्हणण्यापेक्षां हातोहात आंत दिलें. आंतील मंडळींनींहि तें सामान वर घेण्यास मदत केली. काय बोलावें हें सुलभेला सुचेना—नव्हे बोलायला अवसरच नव्हता. पोचवायला आलेल्या मंडळींच्या हवेंत उडणाऱ्या रुमालांना प्रत्युत्तर म्हणून जेमतेम कापऱ्या हातानें तीहि रुमाल उडवीत होती. दारावर हात टेकून ती वांकून बाहेर पहात होती. इतक्यांत गाडी थांबली आणि तिची सारी मित्रमंडळी हास्योद्गार काढीत धावतच तिच्या डब्याजवळ आली.

ती हसतहसत म्हणाली, "काय पण घाबरलें मी!"

मंडळी हसत म्हणाली, "आम्हांला सुद्धां नवल वाटलं! आपण अगदीं वेळेवर आलों होतों."

"हो, पण नेहमीं आपलं असंच." सुलभेची मैत्रिण गाल फुगवून म्हणाली.

"जवळ राहून उशिरां यायचं असंच ना?" सुलभा उद्गारली.

"हो, नेहमी अस्सं—"

"मला वाटलं, माझी गाडी आतां खास चुकणार.

"छे, असं कसं होईल?" एक भाऊ म्हणाला.

"त्याचा काय नेम? बोलण्यांत गढलेली मंडळी— बरं पण पुढील खास अंकासाठीं लेख अन् चित्रं अगदीं जरूर आलीं पाहिजेत हं बाईसाहेब!"

"त्याची नको काळजी. आमच्या ताईसाहेब सव्यसाची आहेत अगदीं. गोष्टी, निबंध, चित्रं अन् कविता, सारं सारं कांहीं पाठवतील. त्यांच्या लिखाणांनींच एक अंक सारा भरून निघेल!" दुसरा भाऊ हसतहसत बोलला.

"भरून निघेल हें मात्र अक्षरशः खरं आहे." ती मैत्रीण म्हणाली.

"खोटं नाहीं."

"पुरे हं. हरभऱ्याचीं झाडं वाळलींत म्हटलं!" ती मैत्रीण म्हणाली.

"ओलीं असलीं तरी तुझं वजन त्यांना झेपलं नसतं हें मला कळतं बरं का!" सुलभा म्हणाली.

"थट्टा नाहीं, खरंच सांगतों. हल्लीं लेखनावर फार झोंड उठवली आहे आमच्या ताईसाहेबांनीं!"

मान तुकवून त्या मुलीनें छानसा रुसका आविर्भाव केला. त्यावर सर्वच मंडळी हसली. सुलभा म्हणाली, "हरकत नाहीं, सर्व लिखाण माझ्याकडेच आलं पाहिजे बरं का! आमची सारी भिस्त बायकांच्या लिखाणावर आहे हें लक्षांत असूं दे."

"इकडची नको काळजी. तीच काय, तिच्या मैत्रिणीसुद्धां मदत करतील. तिकडेच विशेष कॅन्व्हासिंग झालं पाहिजे."

"कसं झालं तरी मोठें शहर आहे तें!"

"हो खरंच."

आणि गाडी सुटली. गाडीला गति येईपर्यंत त्यांनीं एकमेकांचा निरोप घेतला. मंडळी दिसेपर्यंत ती वाकून त्यांना पहात होती. नंतर जागेवर बसून तिनें डब्याचें निरीक्षण चालविलें. सुदैवानें आपण बायकांच्याच डब्यांत बसलों असून डब्यांत फारशी गर्दी नाहीं; पण जी मंडळी आहे ती कांहीं आपल्याला फारशी आवडणारी नाहीं असें तिला आढळून आलें.

एकच पांढरपेशा वर्गांतली पोक्त बाई आणि बाकीच्या गुजराती, मारवाडी आणि इतर खालच्या वर्गांतील बायका होत्या. त्यांच्याकडे दृष्टिक्षेप करून तिनें असंतुष्टतेचा सुस्कारा सोडून हातांतील पुस्तकें खालीं ठेवलीं. 'होल्ड-ऑल' खिडकीपाशीं ठेवला व त्याला टेकून ती शून्यदृष्टीनें बाहेर पाहात राहिली.

'कुठं जायचं?' त्या प्रौढ बाईनें प्रश्न केला.

'काय हा प्रश्न? कोणी कुठंहि जाईल! दुसऱ्याची कशाला एवढी पंचाईत? पण लोकांच्या उठाठेवी केल्याशिवाय या जुन्या बायकांना चैनच पडायची नाहीं मुळीं!'

ती मनांत चडफडली आणि पुस्तकावरची दृष्टि न काढतां उत्तरली,

'असंच पुढं.'

'हं!' ती बाई हंसली. आपल्याशीं बोलण्याची हिची इच्छा नाहीं हें तिनें सहज ताडलें. तिनेंहि वाचायला सुरवात केली.

कांहीं स्टेशनें गेल्यानंतर आपली सहप्रवासिनी कसलासा कसून शोध करीत आहे असें त्या बाईस आढळलें. तिनें पृच्छा केली,

" काय शोधतां ? कांहीं– "

" कांहीं नाहीं. माझी बॅग कुठं दिसत नाहीं ! "

" ती काय ?"

" ती नव्हे, हॅण्डबॅग. "

" हॅण्डबॅग ? कशी होती ? पिवळी का ? डॉक्टर लोकांची असते तशी ? "

" होय, होय, तीच कुठं– "

" अहो, ती तुमच्या माणसानं नेली ! "

" आँ ? राहिली वाटतं तिथं ? आतां ? "

" नाहीं, तुमच्याबरोबरच्या माणसाजवळ आहे. दुसऱ्या डब्यांत बसलाय् ना तो ? "

" काय म्हणतां ? माझी बॅग कोणा माणसानं नेली ? माझ्याबरोबर तर कोणीच माणूस नाहीं ! " स्टेशनावर मला पोचवायला माझी मैत्रीण अन् तिचे दोन भाऊ तेवढे आले होते. पण त्यांनीं तर बॅग वर दिलेली मीं पाहिली होती. "

" हो. काळा चष्मा लावलेल्या त्या मुलानं वर घेतली अन् इथं ठेवली. पण गाडी थांबली तसा तो बॅग घेऊन पुरुषांच्या डब्यांत बसायला गेला ! "

" कोण तो ? जातांना मला दिसला नाहीं कसा ? "

" तुम्ही या खिडकींत वाकून बाहेर पाहात बोलत होतां ना, तेव्हां तो त्य दारानं गेला ! "

" पण मला सांगायचं कीं नाहीं ? "

" मला काय ठाऊक ? तुमच्याबरोबर तो चढला. तुमचं सामान त्यानं भराभर वर घेतलं. तेव्हां तो तुमचाच असेल असं मला वाटलं. नाहींतर बायकांच्या डब्यांत चढल्याबद्दल हरकत नसती का घेतली मी ? "

" मला वाटलं तो तुमचा आहे. "

" छे, मी एकटीच आहें. "

" मीसुद्धां. पण तसं तुम्ही मला सांगायला पाहिजे होतं. "

" तुम्ही मला सांगितलं होतं का ? अहो, बरोबर असं जडजोखीम घेऊन तुमच्यासारख्या तरुण मुलींनीं एकटंदुकटं प्रवास करण्याचे दिवस उरले नाहींत

आतां ! आपलं खुशाल आपल्या माणसांबरोबर पुरुषांच्या डब्यांतन प्रवास करावा. पण बायकांच्या डब्यांत बसूं नये. बरं, पण काय काय गेलं तुमचं ?

उपदेश ऐकून कडवट झालेलें तोंड बाजूला फिरवीत ती म्हणाली,

" काय म्हणजे ! सगळंच ! "

" अरेरे ! असं कसं तुम्हीं त्या बॅगेंत ठेवलं सारं ? पेटीमध्यें ठेवूं नये ? बरोबर कुणी पुरुष माणूस नाहीं. कशी धावाधाव व्हावी अन् कसं सापडावं ! "

ही गडबड ऐकून पलीकडच्या बाकावरील मारवाडी आणि गुजराती स्त्रिया मान उंचावून व पुढें येऊन विचारूं लागल्या,

" क्या हुवो ? " " शुं छे ? शुं थयुं ? "

त्यांच्याकडे नापसंतीच्या नजरेनें पाहात सुलभा म्हणाली,

" आतां जरा ही गडबड थांबवाल तर बरं होईल. मला असला ' शो ' झालेला मुळींच आवडत नाहीं. माझी मी सगळी व्यवस्था करतें. आत्ता गाडी थांबवीन अन् गार्डाला सांगून पुरुषांच्या डब्यांत तपास करवीन. जातो कुठं तो !"

ती बाई हसली. तिनें त्या बायांना आपापल्या जागेवर जायला सांगितलें. नंतर शांतपणें ती म्हणाली,

" तो माणूस अजून राहिला असेल गाडींत ? शक्यच नाहीं. एव्हांना तो उतरून गेला असेल पार. मला तर वाटतं कीं तो बसलाच नसेल मुळीं. तेव्हां गाडी थांबवून आणखी पन्नास रुपयांचा भूर्दंड करून घेऊं नका उगाच. आपोआपच थांबेल ती आतां. "

सुलभेला तें मान्य करावें लागलें. तिची खिन्नता पाहून त्यां बाईनें प्रश्न केला.

" काय काय गेलं ? "

" तसं कांहीं जडजवाहीर नव्हतं. पांच पंचविसांच्या नोटा अन् माझं तिकीट. पण मुख्य म्हणजे माझा अंक. तीच खरी महत्त्वाची चोरी ! "

" कसला अंक ?

" आमच्या ' स्त्रीदास्यविमोचन ' मासिकाचा. "

" आँ ? स्त्रीदास्यविमोचन मासिकाच्या तुम्ही संपादिका कीं काय ? "

" संपादिका नाहीं, सहसंपादिका. "

ती हसून म्हणाली, " वाः ! नांवानं ऐकत होतें, पण आज प्रत्यक्ष गांठ पडली."

" तुम्ही ? " अस्फुटपणें सुलभेनें चौकशी केली.

" मी एक आहें आपली साधी शिक्षकीण ! "

" हो का ? "

अधिक बोलण्यासारखी सुलभेची मनःस्थितीच नव्हती. तिकीट, पैसे–सारें नाहींसें झालेलें ! तार करून पैसे मागवूं म्हटलें तरी तार करण्यासाठीं पैसे उसने घ्यायला हवेतच. ते मागायचे तरी कोणाजवळ ! आणि पैसे उसने काढून तार करायची कोणाला ? तर नुकतीच जिच्याशीं भांडून बाहेर पडलें त्या बहिणीला ! आणि तीहि पैशाची याचना करण्यासाठीं !

तिच्यापुढें मोठाच प्रश्न होता. आंगठा व तर्जनीनें कपाळ दाबून व डोळे मिटून ती क्षणभर स्तब्ध बसली. तें पाहून ती बाई म्हणाली, "हें पाहा, तुम्हीं अशा घाबरून जाऊं नका, तुम्हाला शक्य ती मदत मी करीन. एकमेकांना प्रसंगीं मदत नाहीं करायची तर मग माणसाचा उपयोग तो काय ? तुम्हाला कुठं जायचं आहे ? "

प्रथम बेपर्वाईनें दिलेल्या तुटक उत्तराची आठवण होऊन ती मनांत जरा खजीलच झाली. खालीं पाहात तिनें उत्तर केलें,

" बडोद्याला. तुम्हांला ? "

" सुरतेला. "

" मला तुम्ही दोन रुपये उसने द्याल तर–" अडखळत अडखळत सुलभा पुढें म्हणाली, " तर पुढच्या स्टेशनवर घरीं तार करून मी तारेनं पैसे मागवीन. "

" तुम्हाला पैसे द्यायला माझी कांहींच हरकत नाहीं; पण आतां अनायासें आमच्या दारावरून जातांच आहां, तर एक दिवस आमच्याकडे उतरा ना. नाहीं तरी दोनतीन तास तुम्हाला थांबावंच लागणार आहे. "

" हो, पण शक्य तितक्या लौकर मला गेलंच पाहिजे. या चोरीनं मोठाच घोटाळा झाला आहे. "

" तिचा आपण आतांच तपास लावूं, ही पाहा गाडी थांबली. "

" काय बरं स्टेशन आहे ? "

" सोनगढ. "

त्या दोघींनीं गार्डाच्या कानांवर सर्व हकीकत घातली. तो पार्शी होता. त्यानें विचारलें—

तिकिटाचा अने नोटाचा नंबर लिहूनशी घेतला हाय ?

" नंबर लिहून घेण्यापलीकडे दुसरे उद्योगच नसतात माणसांना जसे कांहीं ! " सुलभा मनांत पुटपुटली. नंतर उघड उत्तरली,

" नाहीं. "

" मंग ? त्यारे तिकिटाचा पैसा भरवा पडेल ! "

" पण तुम्हीं आम्हांला—स्टेशनवरून गाडींत बसतांना पाहिलं आहे. आम्ही तिथूनच बसलों हें तुम्ही सांगूं शकाल. "

" हां. ते तो आमी बराबर सांगेल; पण तोबी काय ? पैसा भरायचा नही चुकेल ! हां, थेटसून बमणा नही घेल ! पण तिथसून त घेल ! "

" आणि आमच्या बॅगचं ? "

" ते आमी स्टेशनमास्तरला सांगते. ते रेल्वे पोलिसला सांगेल. अने ते तमने गायकवाडी पोलीस चौकीवर घेऊनशी जायेल ! ते समदा तपास करेल. बद्धे टेलिग्राम करेल. समदा करेल. तेसाठी तमे अहिंया उतरी पडो तो ठीक ! "

हें ऐकून त्या दोघी सर्दच झाल्या ! त्यांनीं एकमेकींकडे पाहिलें. ही सूचना मान्य करावी असें एकीलाहि वाटेना. दीर्घ निःश्वास सोडून सुलभा म्हणाली, " इतका वेळ निष्फळ घालवायला मला सवड नाहीं. "

योग्य शब्दांत तिनें गार्डाचे आभार मानले. तिची सहप्रवासिनी तिला धीर देत म्हणाली, " बरं केलंत तुम्ही. मीसुद्धां तुम्हांला असंच सुचवणार होतें. अहो, पोलीसचौकीच्या फेऱ्यांत सापडल्यावर भल्या पुरुषाचे बारा वाजायचे ! मग हे तर दुहेरी पोलीस अन् तुम्ही बायको माणूस ! वयानं लहान ! काय निभाव लागणार !

स्त्रीच्या कर्तृत्वशक्तिविषयक अभिमानाला हा मोठाच टोला होता. इतर वेळीं तिनें तो मोठ्या जोरानें परतविला असता; पण आज वेळ अशी होती, की तसें बोलणें वायफळ ठरलें असतें.

" पैशाचं मला वाटत नाहीं इतकं, पण आमचा पुढच्या महिन्याचा अंक अन् खास अंकाचं बरंचसं साहित्य – पुढच्या महिन्याचा सगळा तयार झालेला अंक नाहींसा झाला. आम्हीं मासिक सुरू केल्यापासून अगदीं वेळेवर वर्गणीदारांच्या

हातांत अंक पडला पाहिजे इकडे आमचा कटाक्ष. हा बाणा आम्हीं आजपर्यंत राखला; पण थोडा क्रमांत फरक करायचा होता म्हणून हस्तलिखित बरोबर घेतलं. हं! आतां आक्का काय म्हणेल ? ”

“ त्याबद्दल करूं कांहीं करतां आलं तर!

“ पण उपयोग होईलसं वाटत नाहीं. चोरांना काय ? पैशाशीं कारण. पुरावा सांपडूं नये म्हणून त्यांनीं कागदपत्र केव्हांच नाहीसे करून टाकले असतील; पण माझं केवढं नुकसान झालं आहे ? ”

“ सकाळीं स्टेशनवर भेटलेली मंडळी कांहीं लेखाविषयीं म्हणत होती ना ? ”

खिन्नपणें हसून ती उत्तरली,

“ हुंः! त्यांत काय अर्थ ? ती एक नवशिकी लेखिका आहे. फार तर एकदोन लेख पाठवूं शकेल. त्यानं सबंध अंकाची भरपाई कशी होणार ? ”

“ प्रत्येकानं दोनतीन लेख पाठवले आणि शिलकींत असलेल्या लेखांपैकीं दोन-चार निवडून घेतले तर एका अंकाची व्यवस्था सहज होईल. ”

“ हो, पण पुरुषांचे लेख आम्ही घेत नाहीं हें विसरतां तुम्ही. ”

“ खरंच, हें नव्हतं माझ्या लक्षांत! बरं, मग असं करा ना. नाणावलेल्या कांहीं लेखिकांना तुम्ही तातडीचीं पत्रं, तारा वगैरे पाठवून लेख मागवा ना. ”

“ छे, भ्रम आहे तुमचा! नाणावलेल्या लेखिका उगाच गर्वानं फुगल्या आहेत, त्यांचं पैशाशिवाय पान हालत नाहीं. ”

“ खरं का ?

“ नाहीं तर काय! स्त्रीनं चालविलेल्या मासिकाबद्दल त्यांच्यांत आपुलकीची भावना असती तर त्यांनीं एकजुटीनं आमच्याशीं सहकार्य नसतं का केलं ?”

“ पण तुम्हीं त्यांना कळविण्याचा कांहीं प्रयत्न केला आहे का ? ”

“ आमचं कार्य कांहीं झाकून चाललेलं नाहीं. ”

“ खरं, पण बोलणाराचीं बोरं विकतात. न बोलणाराच्या गव्हाला गिऱ्हाईक मिळत नाहीं, हें विसरतां तुम्हीं! ”

तिनें एक लांब सुस्कारा सोडला आणि म्हटलें,“ जाऊं दे तें. मी अगदीं त्रासलेंच आतां. ” नंतर आठवल्यासारखें करून ती म्हणाली.

" आतां हा प्रथम भूर्दंड भरायचा आहे, त्याकरितां तार करायला—"

" होईल हो, तुम्ही आमच्याकडे उतरणार आहां ना ? "

" पुढं केव्हांतरी. आतां अशा परिस्थितींत पाहुणचारांत वेळ घालवणं मला इष्ट वाटत नाहीं. शक्य तितक्या लौकर मला अंकाची जुळवाजुळव केली पाहिजे अन् हें काम घरीं गेल्याशिवाय होणं नाहीं."

" माझ्यानं होईल तें साह्य मी करीन."

" तुम्हीं लेखिका आहांत ? "

" तसंच कांहीं म्हणतां येणार नाहीं. करतें थोडा कधींमधीं प्रयत्न. पण पुष्कळ लेखिका माझ्या परिचयाच्या आहेत. त्या विद्याबाई—"

" कोण ? ती गर्विष्ठ बाई ! धड पत्राचं उत्तरसुद्धां देत नाहीं ! "

" बरं, पाहूं आपण ! तुम्हीं त्रासलेल्या आहांत; आमच्याकडे उतरा, एक दिवस विश्रांति घ्या, तोंपर्यंत शक्य तें करूं. "

त्या जेव्हां स्टेशनवर उतरल्या तेव्हां त्यांचें स्वागत करायला एक तरुण गृहस्थ आले होते, ते प्रोफेसर असून आपले बंधु आहेत, अशी त्या सहप्रवासिनीबाईंनीं सुलभेला माहिती करून दिली. उलटपक्षीं आपल्या बहिणीबरोबर एक अनोळखी तरुणी आलेली पाहून व तिच्याशीं परिचयविधि झाल्यावर तर त्या गृहस्थास फारच संकोचल्यासारखें वाटलें. टमटममध्यें बसल्यावर ताईंनीं—त्यांच्या बहिणीनें—गाडींतील चोरीसंबंधानें त्रोटक हकीकत सांगितली. पण ते उत्तराखेरीज विशेष बोललेच नाहींत. टमटम थांबल्याबरोबर प्रोफेसरसाहेबांनीं आधीं खालीं उडी घेतली. घाईघाईनें दार उघडून दर्शनी भागांतील कपडे, पुस्तकें इत्यादि अस्ताव्यस्त वस्तु शक्य तितक्या ठीकठाक केल्या. तोंपर्यंत त्या दोघी आंत आल्या. दरवाजावरील पाटीवरचें नांव पाहून सुलभा जरा चमकली. पण त्या नांवाची सांगड गांवाशीं लागत नसल्यानें ती कांहीं बोलली नाहीं; पण तिला जरा अस्वस्थ वाटायला लागलें. कारण नांव होतें—' विद्याबाई ! '

ताईंनीं तिला नळ दाखविला. तेथपर्यंत जातांयेतांच गृहिणीचा हात येथें फिरत नाहीं हें चतुर संपादिकाबाईंनीं ओळखलें. तिनें प्रश्न केला, " प्रोफेसरीणबाई माहेरीं गेल्याहेत वाटतं ? "

" छे ! अद्यापि अस्तित्वांतच आल्या नाहींत. "

" म्हणजे ! "

" बाबाचं लग्न अद्यापि झालेलं नाहीं. "

हें ऐकून ती जरा चपापलीच ! तिची अशी कल्पना कीं प्रोफेसर म्हणजे विवाहित मनुष्य असणार—नव्हे एकदोन मुलांचें पितृत्वसुद्धां त्यांच्याकडे आलेलें असणार ! विद्यार्थिनी पाहून पाहून त्यांची दृष्टि स्थिरावलेली असणार ! तेव्हां ताई बरोबर असल्यावर अशा गृहस्थांकडे उतरण्यास आपणांस तशी विशेष हरकत नाहीं. परंतु ताईचें वरील उत्तर ऐकून तिला कसेंसेंच वाटलें. आजचा दिवस चमत्कारांसाठीं उगवला कीं काय असें तिला वाटलें. विचारानें तिचें डोकें सुन्न झालें. अस्वस्थपणें तिनें दोन घास खाल्ले व आपला श्रांत देह निद्रेच्या स्वाधीन केला.

सकाळीं हाक मारूनच तिला उठवावें लागलें. तिला भेटण्याकरितां कांहीं मंडळी खोळंबली होती; म्हणून मोठ्या नाखुषीनें ती बाहेर आली. कारण तिला फार गळल्यासारखें वाटत होतें. परंतु भेटावयास आलेल्या मंडळींपैकीं कोणी आपली स्त्री-शिक्षण संस्था पाहून चार शब्द बोलण्याबद्दल विनंती करण्यास आले होते, तर कोणी महाराष्ट्रमंडळातर्फे जाहीर व्याख्यान देण्याबद्दल विनवीत होते. त्यांचें म्हणणें असें, कीं इकडील प्रान्तांत अशी संधि वारंवार मिळत नाहीं; करतां कृपेनें व्याख्यानाचा अनुग्रह व्हावा.

आपणांस आकस्मिक असा हा मोठेपणा आलेला पाहून ती चकितच झाली ! आणि याला कारण हीं बहीणभावंडें. कांहींशा रोषानें तिनें त्यांच्याकडे पाहिलें. तिची ती अप्रसन्न मुद्रा पाहून ताई म्हणाल्या,

" अहो, तुम्हाला हें टाळून कसं चालेल ! असे ओळखीदेखीचे प्रसंग तुम्हीं साधलेच पाहिजेत आणि इतरांच्या ओळखीसाठीं कोणी असं हें करतं का ? ज्यांच्यांत कांहीं कर्तृत्व असतं त्यांच्यावरच असे प्रसंग येतात ! "

" कसलं कर्तृत्व ? मासिकावर नुसतं नांव असलं म्हणजे कर्तृत्व झालं काय ? सारं माझी वडील बहीण करते. मी नांवाची—"

" तें कांहीं असो. तुम्ही प्रचार करायला निघालांत ना ? मग अमुक ठिकाणीं करायचा नी अमुक ठिकाणीं नाहीं, असं तर ठरवलं नाहीं ना ? ओळखी वाढल्या-नंतर तुमचा फायदाच होईल. मासिकाला वर्गणीदार मिळतील नी लेखकहि. हजार जाहिरातींपेक्षां प्रत्यक्ष आल्यागेल्याची गोष्ट वेगळीच पडते."

आणि शेवटीं सुलभेला संमति देणें भागच पडलें. व्याख्यानस्थानाकडे तिच्या टमटमपुढें एक मोटार थांबली होती. तिचें दार उघडून आधीं आंतील गृहस्थ उतरला आणि आंतील तरुणीला हात देऊन त्यानें हलकेंच उतरविलें. "मोटारीच्या ठेंगण्या पायरीवरून खालीं उतरायलासुद्धां आमच्या धडधाकट बायकांना मदत लागते अं! काय हें परावलंबित्व!" परंतु उतरतांना तरुणीनें सलज्जपणें केलेलें मधुर हास्य व त्यामुळें त्या तरुणाच्या मुखावर प्रतिबिंबित झालेलें आत्यंतिक समाधान हे भाव पाहून तिला वाटलें– हें दृश्य चित्रित करायला किंवा लेखांत गोवायला छान आहे! आपल्या खास अंकाच्या मुखपृष्ठावर देण्यासारखें आहे. वरील विचारतंद्रींत असतां टमटमच्या उंच पायरीवरून खालीं उतरतांना लुगड्यांत पाय अडकून ती खालीं पडायचीच, पण झटकन् प्रोफेसर पुढें झाले व तिला हात देऊन त्यांनीं सावरलें. अनपेक्षित, परंतु योग्य वेळीं तत्परतेनें मिळालेल्या साह्यामुळें तिला एक प्रकारें भारावल्यासारखें वाटलें. तिच्या त्या हाताला सारख्या झिणझिण्या येत होत्या आणि व्याख्यान देतांना आणि रात्रीं झोपल्यावर निद्रेंतहि त्या तिला जाणवत होत्या. घरीं आल्यावर संकोचामुळें तिला कांहींच बोलावेंसें वाटत नव्हतें. परंतु आपलें एवढें अगत्यपूर्वक आतिथ्य करणारांशीं अबोल तरी किती राहावयाचें? कांहीं बोललें पाहिजे म्हणूनच नव्हे, तर थोड्याशा जिज्ञासेनें तिनें विचारलें, "कसं काय झालं व्याख्यान आमचं? सराव नाहीं म्हणून विचारतें."

"अगदीं अस्खलित."

"तें नाहीं विचारीत. विचार कसे काय पटले–"

"छान! 'स्त्री-पुरुष हे समाजाचे स्वतंत्र घटक आहेत. आपल्या कर्तृत्वानं ते आपलं व्यक्तिमत्व प्रस्थापित करूं शकतील. त्याकरितां सर्वांनींच विवाहशृंखला अडकवून घेतल्या पाहिजेत असं नाहीं–' हा तुमचा मुद्दा मला आवडला."

"आवडेल तर काय? समानधर्मीयांना एकमेकांचे विचार आवडायचेच!" ताई म्हणाल्या.

"स्त्रियांत हल्लीं किती परावलंबित्व आहे! कल्पना नाहीं तुला ताई!"

"अरे, ह्या समोर असतांना तरी असं बोलूं नकोस. पुरुषांच्या मदतीशिवाय स्वतंत्रपणानं त्या आपला उद्योग करीत आहेत."

"पण हें उदाहरण अपवादाच्या सदरांत येईल. त्यानं सर्वसाधारण स्त्री-समाज–"

" तो सर्वसाधारण स्त्री-समाज राहूं दे. पुरुषसमाजाविषयीं बोल कांहीं–"

" काय बोलूं ? दिसतंच आहे कीं तो हल्लीं कसा बेकार आणि हतप्रभ झाला आहे तो. "

सुलभेला जांभया देतांना पाहून त्यांनीं वाद आवरता घेतला व पानें मांडलीं. सुलभेला जेवण मुळींच गेलें नाहीं. लौकरच ती झोपावयास गेली. तिच्या या तुटक वर्तनाचें ताईंना जरा आश्चर्यच वाटत होतें. परंतु मध्यरात्रीं जेव्हां तिचा कण्हण्याचा आवाज आला, तेव्हां त्यांनीं जवळ जाऊन पाहिलें तों ती तापानें फणफणलेली होती. सकाळीं औषधयोजना केली तरी दुखण्याचें मान कमी होईना ! मेंदूला कसला तरी ताण पडला, असें डॉक्टरचें म्हणणें पडलें.

पांचपंचवीस रुपये गेले नी थोडेंसें लिखाण हरवलें तर या मुलीनें मनाला इतकें लावून घेतलें, या गोष्टीचें ताईंना आश्चर्य वाटलें. " हल्लींची पिढी हळवी झाली हेंच खरें; " असें त्यांनीं मनांत म्हटलें आणि मोठ्या आस्थेनें त्यांनीं सुलभेची शुश्रूषा केली. प्रोफेसरसाहेबहि अतोनात श्रम घेत, पण दुखण्याचें स्वरूप जरी सौम्य दिसत होतें तरी तें मागें पाऊल घेईना. त्यांना काळजी वाटत होती. परंतु " आपल्या बहिणीला मुळींच कळवूं नका. ती घाबरून जाईल, धावत येईल व कामाचा घोटाळा होईल. मीच दोन दिवसांनीं जाईन घरीं–" अशी समर्पक सबब सांगून सुलभा त्यांना आक्कांना पत्र पाठवूं देईना. परंतु आणखी दोन दिवस गेल्यावर सुलभेचें ऐकून स्तब्ध राहाणें शहाणपणाचें होणार नाहीं अशा विचारानें त्यांनीं तिच्या बहिणीला तार करण्याचें ठरविलें. तोंच खुद्द संपादकबाईंचें पत्र त्यांच्या हातीं आलें. त्यांत लिहिलें होतें—" तूर्त मुलीला पहावयास येऊं नये. कारण सुट्टी असल्यामुळें ती मैत्रिणीबरोबर ट्रिपला गेली आहे. शिवाय यंदा लग्न करण्याचा तिचा विचार नाहीं. "

या पत्रानें तिच्या आजाराची मीमांसा त्यांना करतां आली. त्यांनीं लगेच आक्कांना तार करून बोलावून घेतलें. सर्वांनी परिश्रमपूर्वक शुश्रूषा कशी केली, आपण दुसऱ्याच्या घरीं एकाकी नाहीं, आपली बहीण जवळ आलेली आहे या जाणिवेनें सुलभेच्या मनावर चांगला परिणाम होऊन दुखणें हटायला कशी मदत झाली हें विस्तारपूर्वक सांगण्याची जरूरी नाहीं.एवढेंच येथें सांगितलें पाहिजे कीं दुखण्यांतून बरी होऊन ती जेव्हां घरी गेली तेव्हां आपलें कांहीतरी हरवलें आहे असें तिला कळून आलें.

ही हरवलेली वस्तु म्हणजे आपलें हृदय होय आणि त्याची चोरी प्रोफेसरांसारख्या सुशिक्षित संभावितानें केली आहे, ही त्यांतल्या त्यांत इष्टापत्ति तिला वाटली.

आक्कांनीं हुडकून आणलेला अनोळखी श्रीमंत नव्हे हा; पारखून घेतलेलें खरें नाणें आहे हें; या विचारानें तिच्या मनाला सुखसंवेदना होत होत्या. सर्व टर्मभर त्या नाण्याचा मधुर नाद तिच्या कानांत निनादत होता. दिवाळीच्या सुट्टींत जेव्हां ती घरीं आली आणि त्यांच्या मासिकाच्या खास अंकाच्या प्रकाशनसमारंभाच्या वेळीं त्या बहिणभावांना आक्कांनीं निमंत्रण करून बोलाविलें तेव्हां त्या प्रसंगीं त्या दोघांनीं आपला निश्चय जाहीर करून वाङ्निश्चय करून घेतला.

मंडळी मजेंत बोलत बसली असतां आक्का म्हणाल्या,

"सुलभा! ज्यांच्याशीं लग्न न करण्याच्या निश्चयानं माझ्याशीं भांडून गेलीस ती थेट आपल्या पायांनीं नेमकी तिथंच जाऊन पोचलीस ना?"

"अहो आक्का, त्या गुलाबी पाकिटांतलं गुलाबी कोडं आतां असं उलगडून कशाला दाखवतां? तिनं कांहीं तुमच्याआमच्या शब्दाला मान तुकवली नाहीं. चागलं आपल नाणं पारखून घेतलं आहे. होय ना सुलभा?" ताईच्या प्रश्नावर सुलभेनें शाब्दिक उत्तर दिलें नाहीं, पण तिच्या गुलाबी गालांनीं चहाडी केली!

---

# जगू : : ९

जगू हा सातांनवसांनीं होऊन जगलेला पोरका पोर होता. नवसासायासांनीं झालेला म्हणून त्याचें कोडकौतुक फार होत होतें अशांतली गोष्ट नाहीं. त्याचा प्रतिपाळ त्याची म्हातारी आजी करीत होती. प्रेमानें नव्हे, तर कर्तव्य म्हणून. तिचा तरी बिचारीचा काय दोष ? तिनें ज्यांच्यावर प्रेम केलें होतें, ज्यांच्या खस्ता काढल्या होत्या, ते सारे तिला अशा असहाय स्थितींत टाकून चालते झाले होते. म्हातारपणीं सुखाचे दोन घांस आयते मिळण्याऐवजीं स्वतःच्या व नातवाच्या पोटाकरितां तिला कष्टानें कमवावें लागत होतें. एक तर म्हातारपण, आणि त्यांत भांडीं धुण्यासारखीं ओल्यांतलीं कामें करायचीं; त्यामुळें तिचे पाय भेगा पडून जीर्ण झाले होते. या साऱ्या दुःखद स्थितीमुळें एक प्रकारें जगाला ती विटली होती. प्रेम करायला, प्रतिपाळ करायला किंवा खस्ता खायला आतां तिच्यांत त्राण उरलेलें नव्हतें. पण—आपल्या वंशाचा शेवटचा एकच एक अंकुर ! वास्तविक याच्या पायगुणानेंच आपल्या वंशाचा आधार असा आपला एकुलता एक तरुण मुलगा अकालीं मृत्युमुखीं पडला होता. तत्पूर्वीं लक्ष्मीसारखी आपली सून याला जन्म देतांनाच स्वर्लोकीं प्रयाण करती झाली होती. असा हा दळभद्री असला, तरी वंशाचा अंकुर आहे. याच्यामुळेंच आपल्या कुळाचें नांव मागें राहणार आहे. याच्या हातानेंच आपली सद्गत होणार आहे. तेव्हां—

आणि तो बिचारा तरी असा काय सुखाच्या राशीवर लोळतो आहे ? ना अंगभर कपडा, ना पोटभर अन्न. मग हौशीचें नी सुग्रास असें कोठलें काय ? त्याचे आईबाप असते तर त्याची अशी दशा असती का ?"

अशा कांहींशा स्वार्थी अनुकंपेनें म्हातारी आपणाकडून होईल तसा त्याचा प्रतिपाळ करीत होती. जगूचें व्यवधान पाठीमागें असल्यामुळेंच जणूं काय ती जगत होती.

अवघा चार वर्षांचा जगू. ना शाहाणा ना समजूतदार. त्याला म्हातारीच्या मनःस्थितीची आणि स्वतःच्या परिस्थितीची जाणीव कोठून असणार ? म्हातारीलाच तो आई म्हणत असे. कारण त्याला आठवत होतें त्या वेळेपासून आजतागायत म्हातारीच त्याचा प्रतिपाळ करीत आली होती. तेव्हां तिनें कसेंहि वागविलें

तरी तो तिला आईच समजत असे. पण हें न साहूनच कीं काय, जग त्याला वस्तुस्थितीची जाणीव करून द्यायला सज्ज असे.

एके दिवशीं खेळत असतां रडत रडतच तो घरीं येऊन म्हातारीला म्हणाला,

" आईग, तूं मला फसवतेस ! तूं नाहीं जा माझी आई. दगू म्हणतो, तूं आजी आहेस. अन् दगूची आई पण तसंच म्हणते. मग दगूच्या आईसारखी कुंकूं लावणारी माझी आई अन् बाबा कुठं आहेत ? सांगना !"

बिचारी म्हातारी ! "सगळ्यांना निर्दाळून बसला" "दळभद्री मेला" अशीं महावाक्यें त्याला नेहमीं ऐकवीत असे. पण त्यानें होऊन काढलेला हा आर्त स्वर तिला असह्य झाला. त्याला जवळ घेऊन आंसूंभरल्या डोळ्यांनीं न्याहाळीत ती म्हणाली,

"माझ्या सोन्या ! तुझे आईबाप मला दुःखांत टाकून गेले रे. माझी आंधळीची काठी आतां तूंच."

परंतु त्याला आपल्या प्रश्नाचें उत्तर पाहिजे होतें. तो म्हणाला,

"पण बाबा कुठं गेले सांगना."

मागील आठवणी मनांत उभ्या राहून म्हातारीला दुःखाचे कढ येऊं लागले तरी त्यांतून तिनें नातवाच्या चौकशीचें कारण शोधून काढलें. 'त्याच्या सवगड्यांपैकीं पुष्कळांना चांगले चांगले कपडे शिवण्यांत आले होते. लौकरच कसलासा उत्सव होणार होता, त्याकरितां ही तयारी. आणि कुणाला उत्तम खाऊ तर कुणाला सुंदर खेळणें हीं तर नित्यशः मिळत होतीं. त्यांचे आईबाप त्यांना देत होते. याची आई देऊं शकत नव्हती ! याचें कारण ती कांहीं खरी आई नव्हती ! आजी होती.' "सांगना कुठें गेले ? अं अं अं." त्याचें पालुपद सुरूच होतें. म्हातारी समजुतीनें म्हणाली,

" दूर देशीं गेला. तुला छान छान खाऊ आणायसाठीं. तुझा बाप दूर देशीं गेला बरं बा."

आणि तेव्हांपासून त्याची त्याप्रमाणें समजूत करण्यांत येई. केव्हांही कोणत्याही वस्तूचा त्यानें छंद घेतला कीं, म्हातारी सांगे,

" तुझा बाप येईल, तेव्हां तें सारं घेऊन येईल; तें आणायलाच तो गेला आहे."

आणि मोठ्या आतुरतेनें तो आपला बाप येण्याची वाट पाही. पण जवळ जवळ २॥—३ वर्षें होत आलीं, तरी त्याचा बाप दूर देशाहून परत आला नाहीं.

त्याच्या सवंगड्यांनीं आपापल्या प्रलोभनीय वस्तू दाखवून त्याची पोरबुद्धि उत्तेजित केली, तर मनांत कितीही खळबळ होत असली तरी वरकरणीं तो म्हणे,

"आम्हाला नकोच मुळीं! माझे बाबा दूर देशाहून येतील तेव्हां आम्ही खूप खाऊं." किंवा मित्रांनीं थोडेंसें हातावर ठेविलें तर तें स्वीकारून म्हणत असे, "बाबांनीं आणल्यावर तुम्हांला मी थोडं देईन." आपण एवढं जीव तोडून बोलत असतां मित्रांनीं खदखद कां हंसावें व आईनें मुळुमुळु कां रडावें हें त्याला कळत नसे.

× × ×

सहा मेचा दिवस. जिकडे तिकडे आनंदोत्सवाची मोठी गडबड सुरू होती. जगूचें गांव दीडशें डोईचें एक लहानसें खेडें होतें. तरी तें यांतून वगळलेलें नव्हतें. म्हातारीनें एकलें कीं, **रौप्य ज्युबिली नांवाचा राजाच्या गादीचा पंचविसावा वाढदिवस** मोठ्या थाटानें साजरा होणार आहे, आणि विशेष हें कीं, शाळेंत जाणाऱ्या प्रत्येक लहान मुलाला चांगला पावशेर खाऊ आणि सद्रा चड्डी असे दोन दोन कपडे मिळणार आहेत. हे कपडे म्हणे थोरांमोठ्यांच्या बायकांनीं शिवून तयार केलेले आहेत, अन् खाऊसुद्धां थोरामोठ्यांचीं मुलें खातात तसल्या उच्च प्रतीचा! फार फार वर्षांपूर्वी असलेच एक दोन उत्सव झाल्याचें म्हातारीला अंधुक आठवलें. तेव्हां जगूचा बाप शाळेंत जाण्याच्या वयाचा होता, पण शाळेंत जात नव्हता. लोकांच्या मुलांना मिळालेला खाऊ पाहून त्यानें जेव्हां हट्ट घेतला तेव्हां त्याच्या बापानें तसलाच खाऊ त्याला चटकन आणून दिला होता. पण आज? आजहि तसलाच प्रसंग. जगू शाळेंत जाणारा नव्हता, पण त्यानें हट्ट धरला तर तो पुरविणाराही कोणी नव्हता. मोलमजुरी करून जेमतेम पोट भरणाऱ्या म्हातारींत तें सामर्थ्य नव्हतें. तिनें दूरदर्शित्वानें त्या दिवशीं आपल्या नातवाला बरोबर शाळेंत नेण्याविषयीं शेजाऱ्यांच्या मुलांचीं मनें वळविलीं.

त्या दिवशीं त्याच्या गळयांत एक फाटकी पैरण अडकवून ती म्हणाली—

"तुला छान छान खाऊ हवाना? मग यांच्याबरोबर जा. आज तुला खरोखर खाऊ मिळेल."

कपड्यांबद्दल आशा लावणें तिला अयोग्य वाटलें. पण एवढ्या उत्सवांत एक मुलगा खाऊंतून वगळला जाणार नाहीं याबद्दल तिला खात्री वाटत होती.

खाऊ ! अर्थात् बापाशिवाय कोण देणार ? तो म्हणाला,

" बाबानं आणला का ?

म्हातारीनें होकारार्थी मान हलविली.

" बाबा घरीं येणार ? "

डोळ्यांत आलेलीं आसवें पदरानें पुशीत म्हातारीनें हुंदक्यांतून अस्पष्ट उत्तर दिलें " हं. "

" अन् माझं अंगांतलं असं फाटकं "–

" जा, जा, आतां मिळल तुला नवं. "

तो आनंदानें मुलांच्याबरोबर शाळेंत गेला. शाळेची लहानशी इमारत रंगीत कागदांच्या झालरीनें सुशोभित केली होती. रंगीबेरंगी कपडे घालून लहानमोठीं मुलें–त्यांत दोन मुलीहि होत्या—शाळेंत आलेलीं होतीं. त्यांचीं तोंडें आनंद व जिज्ञासेमुळें प्रफुल्ल झालेलीं दिसत होतीं. त्यांच्या हसण्याबागडण्याला कोणी फारशी हरकत घेत नव्हतें. उलट रागीट म्हणून नांव मिळविलेले मास्तरच मुलांना म्हणत होते, " चलारे लेझिम खेळायला " " चलारे कुस्तीला " आणि मुलींना तर प्रारंभींच "गाणीं " म्हणायला लावलीं होतीं ! हंसणें, खेळणें, गाणीं म्हणणें इत्यादि प्रकार शाळेंत चालत असतील अशी त्याची कल्पना नव्हती. शाळा म्हणजे मुलांना शिक्षा देण्याची जागा असें त्याला वाटत होतें. कारण शेजारच्या मुलांना टांगाटोळी करून नेतांना त्यानें अनेकदां पाहिलें होतें. आपल्या कल्पनेपेक्षां निराळा प्रकार पाहून तो कांहींसा भांबावून गेला. त्याची चौकस दृष्टि सभोंवार आपल्या काल्पनिक बापाचा शोध करूं लागली. उच्चासनीं बसलेल्या मंडळींत एक निराळ्या तऱ्हेचा–सुटाबुटांचा पोषाख केलेली व्यक्ति बसली होती खरी. आणि जवळच एक बाईहि बसली होती ! त्या दोघांसारखा पोशाख त्या गांवांत कोणीच करीत नसे. दूरदेशाहून आलेलीं माणसेंच असला पेहेराव करीत असावींत असें त्याला वाटलें. त्यानें त्यांच्या पेहेरावावरून आपल्या पैरणीकडे दृष्टि वळविली आणि घामानें डबडबलेलें तोंड फाटक्या पैरणीच्या मळक्या बाहीला पुसलें. ती व्यक्ति–" आपले परमपूज्य बादशहा "–असें कांहींसें बोलत होती. पण जगूला त्यांतलें कांहीं कळत नव्हतें. तो पोषाख आणि हा–

ांची अव्यक्तपणें जणूं काय तो तुलनाच करीत होता, आणि त्याचें अंतर्मन हळूंच वेचारीत होतें, " हे तुझे आईबाप " ? त्याचा चेहरा गोरामोरा झाला. " आपल्याला त्यांनीं पाहिलें तर ? " इतक्यांत काय झालें न कळे.

" बाळ, बाळ. चल " असें म्हणून कोणींसें त्याला पुढें ढकलूं लागलें. दुसरीं मुलें भराभर पुढें जाऊन त्या दूरदेशींच्या माणसांकडून खाऊचे पुडे व कपडे घेत होतीं. पण याचें पाऊल उचलेना. तो पुरताच भांबावला. " बापापुढें अशा फाटक्या वेशानें जायचें ! " इतक्यांत ती बाई खालीं उतरली. तिनें आपल्या हातांनीं त्याच्या अंगावर सुबक नवे कपडे चढविले, आणि त्या गृहस्थांनीं हात पुढें करून त्याच्या हातीं पुडा देत म्हटलें, " हा घे तुला खाऊ. " स्वरांत शक्य तितकें मार्दव आणून मास्तर म्हणाले, " हां, साहेबांनीं हे कपडे दिले. आतां रोज शाळेंत येशील ना ? जा. बैस जागेवर. "

तो वळण्यापूर्वी बाईनें त्याच्या पाठीवर हळूच थोपटल्यासारखें केलें आणि ती हंसली. असा हास्यांतील प्रेमळपणा त्यानें यापूर्वी कधींच अनुभविला नव्हता. समारंभ संपल्यावर सवंगड्यांसह आनंदानें तो बाहेर पडला. खाऊ खावासें वाटत असूनहि मोठ्या निग्रहानें त्यानें आपला पुडा अगदीं तस्सा ठेवला होता. मित्रांनीं आपल्या पुड्यांतून थोडेसे दिलेले बदामबेदाणे तोंडांत टाकीत तो म्हणाला,

" माझ्या बाबांनीं दिलेला खाऊ घरीं आईला दाखवल्याशिवाय नाहीं खायचा !"

आणि हें ऐकून त्याचे सोबती हंसले.

× × × ×

त्याची आजी दारांत बसून त्याची वाटच पहात होती. आळींतील एक दोन मुलें आलीं होतीं, त्यांच्या सांगण्यावरून आपल्या नातवालाहि कपडे व खाऊचा पुडा मिळाल्याचें तिला आधींच कळलें होतें. खाऊच्या पुड्यांत बदाम, बेदाणा, काजूगर, जरदाळू, खडीसाखर इत्यादि सुकामेवा असल्याचे तिनें पाहिलें, आणि आपल्या नातवानें जन्मांत न चाखलेला हा खाऊ, आपण गाडग्यांत जपून ठेवूं व रोज थोडथोडा देऊन निदान आठवडाभर तरी त्याला पुरवूं असें ती मनाशीं बोलत होती. इतक्यांत तिचा नातू तिच्यापुढें येऊन उभा राहिला. म्हातारीनें त्याला जवळ ओढून त्याच्या अंगावरचे नवे कपडे न्याहाळून पाहिले. कपडे छान होते, पण हातांत पुडा नव्हता. तिनें विचारलें—

" खाऊ नाहीं मिळाला ? "

त्याचें तोंड गोरेंमोरें झालें. रुद्ध स्वरानें तो ह्मणाला, " मिळाला. "

वीज कडाडावी त्याप्रमाणें कडाडून म्हातारी म्हणाली,

" मग तिथंच गिळलास कीं काय सारा ? मला तर खायचा नव्हता ? ( म्हातारीला दांत नव्हते ) आठ दिवस तुलाच पुरला असता—पण दळभद्री मेला—"

तो स्फुंदत म्हणाला—" मी नाहीं खाल्ला. दामू म्हणाला कीं, तुझ्या बाबांनीं नाहीं खाऊ दिला. साहेबांनीं दिला—"

ह्मातारी ओरडून ह्मणाली—" मग ? "

" तो त्याला देऊन मी हें घेतलें. "

लहानशा लाडवाएवढा एक मळकट गोळा काढून आजीच्या हातावर ठेवीत तो ह्मणाला.

" काय तें ? कोकंबेल ?—"

" हो. "

" काय अवलक्षणी पोर आहे ? कशालारे हें ? "

" तूं नव्हती का म्हणालीस, पायांच्या भेगांत भरायला कोकंबेल मिळालं तर बरं होईल. "

कपाळावर हात मारून ती ह्मणाली,

" आँ ! आन् आपला सोन्यासारखा खाऊ देऊन तूं हें घेतलंस ? माझ्यासाठीं घेतलंस ? "

तिच्या डोळ्यांत अश्रु उभे राहिलेले पाहून तो स्मितपूर्वक ह्मणाला,

" हो. तुझे पाय आधीं बरे कर. माझे बाबा आणतील तेव्हां खाईन मी खाऊ. "

आपल्या कानशिलावर काड्कन बोटें मोडून त्याला जवळ घेत ती म्हणाली,

" अर माझ्या राजा ! देव तुला उदंड आउक्ष दिल् ! "

---

# दुरुस्ती



ते दोघे बरोबरच बाहेर पडले. त्यांना या निश्चयाप्रत येऊन त्याप्रमाणें दृढतेनें ाहेर पडतांना पाहून सर्वजण आश्चर्यचकित झाले. नाहीं तरी आज सातआठ ाहिने ' मारूं किंवा मरूं ' या अभिनिवेशानें ते लढत होते आणि आतांच कुठें यांच्या तंट्याला रंग चढला होता. तोंच हें वारें आज त्यांच्या–त्यांच्या म्हणण्या- ेक्षां चुनियाच्या–त्यांपैकीं मोठ्या भावाच्या–डोक्यांत कोठून कसें भरलें व ुटकीसरसा तंट्याचा निकाल लागला. दोहों पक्षांचे वकील या अनपेक्षित ्क्क्यानें हबकूनच गेले. त्यांच्या स्वप्नींसुद्धां नव्हतें, असें होईल म्हणून. चांगलें र्षभर चरण्यासारखें क्षेत्र. एखाद्या सराईत प्राण्यानें आशेनें शेतांत यावें, आणि शेताला नवीनच कुंपण घातलेलें दिसावें; अगदीं तशीच गत झाली त्यांची. अगदीं अवाक् झाले ते. पण करणार काय ? शिष्टाचार. त्यांना झाला तरी शिष्टाचार कसा सोडतां येईल ? मोठ्या आनंदाचा आव आणून त्यांनीं आपापल्या अशिलांनीं तहनाम्या- वर कोठें आंगठे उठवावे तें स्थान दाखवून दिलें व अशा रीतीनें आज सातआठ महिने जुळून आलेला त्यांचा संबंध सुटला.

ते दोघे भाऊ बरोबरच बाहेर पडले. दोघेहि स्तब्धच होते. आपल्या छाती- वरचें मोठें दडपण दूर झाल्यासारखें त्यांना वाटत होतें, तरी निश्चितीचा श्वास त्यांना घेतां येत नव्हता–अशी चमत्कारिक मनःस्थिति झाली होती दोघांचीहि ! दोघांच्याहि भोंवतीं इष्टमित्रांचें कडें होतेंच. यावेळीं मात्र त्यांना तें असह्य झालें होतें. चुनिया झपाझप पावलें टाकीत पुढें सटकला. तरी त्याच्या मित्रांनीं त्याची साथ सोडली नाहीं. वाटेंत नेहमींचें विश्रांतिस्थान–दारूदुकान–लागलें. नी पानगृहस्वामीनें स्वागतहि केलें; पण चुनियाचे पाय तिकडे वळले नाहींत; तो पुढेंच निघाला. मित्रांची मोठी निराशा झाली; परंतु पुढें चहापानगृहांत तरी हा थांबेल, या आशेनें ते त्याच्याबरोबर चालूं लागले. पण व्यर्थ. आज चुनियाच्या दृष्टीला कांहीं दोषच झाला असला पाहिजे असा त्याच्या मित्रांनीं तर्क केला. नाहींतर चहावाल्याच्या हांका आणि पुढच्या कोपऱ्यावरील पानपट्टीवाल्यानें पानतंबाखूनें किटलेले दांत विचकीत अगत्यानें पुढें केलेली पानपट्टी पाहिली ना पाहिलीशी करून तो झपाट्यानें पुढें झटकलाच नसता. मित्रपरिवाराप्रमाणें दुकानदारहि दिङ्मूढ झाले त्याच्या अशा वर्तनानें. कसा झाला तरी आज सातआठ महिन्यांचा

घनिष्ठ परिचय. साक्षीदार पढवायचीं हींच ठिकाणें. साक्षीदारांचे करारमदार ठरवितांना किती पेले, किती पानपट्ट्या नी किती बिड्याकाड्या बसल्या बैठकीला फस्त होत, याचा नेमच नव्हता. असा हा क्रम आज इतके दिवस सुरू होता. त्यामुळें धंद्याला कशी तेजी आली होती. कांहीं झालें तरी पुढें ४।६ महिने तरी त्यांत खंड पडेल ही धास्ती नव्हती. मग आज एकाएकीं काय हें असें झालें ?

प्रत्येक यंत्राची गती अनेक लहान लहान चक्रांवर अवलंबून असते. ज्याचें अस्तित्व सामान्य जनाला जाणवणारहि नाहीं, अशी एखादी बारीकशी 'स्क्रू' सारखी वस्तु हरवून किंवा बिघडून एखादें बारकेंसें चक्र जर अडून बसलें, तर बाकीचींहि थांबून त्यायोगें मुख्य यंत्र लगेच थांबतें. धंद्यांच्या ऱ्हासाचेंहि कांहींसें असेंच आहे. आतांच पहाना. "मला खटला पुढें चालवायचा नाहीं. फिर्याद काढून घ्यायची" एवढीं साधीं दोन वाक्यें चुनियानें कायदेशीरपणें जाहीर केलीं मात्र. वकील, दारूदुकानदार, चहावाला, पानपट्टीवाला, चुनियाचे इष्टमित्र–झाडून साऱ्यांच्या धंद्यावर एकदम अनिष्ट परिणाम झाला ! आपलें खात्रीचें गिऱ्हाईक असें एकाएकीं गेल्याचें दुःख काय थोडें असतें ? इष्टमित्रांनीं पाहिलें कीं, दुकानें तर मागें राहिलीं. आतां पुढें जाण्यांत अर्थ काय ? त्यांनीं तेथूनच त्याला रामराम ठोकला. कारण त्याच्या वर्तनानें आलेला शीण कोणत्यातरी मार्गानें लौकर घालविणें त्यांना अवश्य वाटत होतें.

चुनिया विचारमग्न स्थितींत खालीं पहात चालला होता. दगदगींतून मुक्त झाल्यासारखें त्याला वाटत होतें, तरी एक प्रकारें गुदमरल्यासारखें त्याला वाटत होतें. त्याच्या मागें फर्लांगावर त्याचा धाकटा भाऊ रघिया खालीं मान घालून येत होता. तोहि भारावलेल्या मनःस्थितींत, सरावाच्या मार्गानें पाय चालत होते म्हणूनच घराकडे तो येत होता. स्वप्नांत असल्यासारखें त्याला वाटत होतें. आजच्या या अनपेक्षित निकालानें सुटल्यापेक्षां जखडल्यासारखेंच त्याला अधिक वाटत होतें. म्हणून नेहमींची छत्तीसाच्या आंकड्यासारखी भावा-भावांतील चालीची दिशा विसरून जणूं मंत्रमुग्धाप्रमाणें तो आज भावामागून जड पावलांनीं चालत होता.

दोघांच्याहि गृहस्वामिनी आपापल्या पडवींत उभ्या राहून पतीची मार्गप्रतीक्षा करीत होत्या. घरांतून पडवींत आणि पडवींतून घरांत अशा आज किती तरी

झेपा त्यांनी केल्या होता. जसजसा वेळ जात चालला तसतशी त्यांची हुरहुर वाढत चालली होती. आपला धनी सुखरूप परत यावा यांकरितां दोघींनींहि मनोमनीं एकएका नारळाचा नवस देवीला केला होता! शेवटीं आपापल्या धन्याला येतांना पाहून दोघींनाहि हायसें वाटलें. आनंद झाला, पण दिराला पाहून जें दुःख झालें त्याच्या पासंगासहि पुरण्याचें सामर्थ्य त्या आनंदांत नव्हतें. दीर परत येईल अशी दोघींपैकीं एकीचीहि अपेक्षा नव्हती. प्रत्येकीला आपापल्या मनाशीं वाटत होतें कीं, आज आपला दीर कांहीं महिने तरी जाईल किंवा जावा. मग आपली जाऊ रडत बसेल. तसेंच केवळ झालें नाहीं, तर सरकारचीं माणसें येतील; आपल्या नुकसानभरपाईसाठीं दिराचीं गाडगींमडकीं बाहेर काढतील व त्यांची जागा आपणास रिकामी करून मिळेल; आणि अशा रीतीनें तीं अभागी माणसें आश्रयहीन होऊन रडत बसतील. मग आपण म्हणूं "आतां कां! करतांना गोड वाटलें अन् भरतांना?"

पण हे प्रत्येकीचे मनांतले मांडे मनांतच राहिले. ते दोघे भाऊ एकामागें एक मुकाट्यानें येत होते. अन् त्यांच्यामागें पोलीस नव्हते. केवढी ही निराशा!

चुनिया घरांत शिरल्यावर दबत दबत रघियाहि आपल्या घरांत गेला. आंगणांतच खटुली पडली होती, तीवर त्यानें भारावलेलें आंग टाकून दिलें. त्याची बायको पाण्याचा पेला घेऊन पुढें आली. निकाल ऐकण्याची उत्कंठा तिला कांहीं कमी नव्हती. पण ती आपल्या जावेपेक्षां जरा सुज्ञ असल्यामुळें, कारव्याचा कूड दृष्टीला प्रतिबंध करूं शकतो, कानांना नाहीं हें जाणत होती. शिवाय घाई करण्याचें कारणहि नाहीं हेंहि ती जाणत होती.

आपली जाऊ कांहीं स्वस्थ बसणार नाहीं. रणगर्जना करून काय झालें तें ती ऐकवीलच सर्वांना. अशा धीराच्या विचारानें तिनें शान्तपणें नवऱ्याला चूळ भरायला पाणी दिलें. नंतर त्याच पेल्यांत तासाभरापासून उकळत असलेला चहाचा काढा आणून दिला. त्याच्याहि घशाला कोरड पडलीच होती. तें पेय पिऊन तो स्वस्थ डोळे मिटून पडला.

चुनियानेंसुद्धां खाटेवर आंग टाकलें होतें. विचार, विचार, विचारानें त्याचें डोकें ठणकत होतें. सहानुभूतीच्या शब्दांची, ममतेच्या स्वागताची त्याला गरज भासत होती. पण त्याची बायको सुखिया ही निकाल ऐकायला अधीर झाली होती. नवऱ्याचा थंडपणा तिला असह्य वाटूं लागला. अधीरतेनें तिनें विचारलें:—

" हं, काय झाला खटल्याचा निकाल ? "

त्यानें कांहींच उत्तर केलें नाहीं. तीच पुढें विचारूं लागली.

" तारीख पडली वाटतं ? "

" नाहीं. "

" मग ? "

" मीं दावा काढून घेतला ! "

आश्चर्यानें ती दिङ्मूढ झाली. गेले कांहीं महिने रक्ताला सोकावलेल्या हिंस्र पशूंसारखे भांडत असलेले दोघे भाऊ ! आज ही उपरति कशानें झाली ? तिला कांहीं कल्पना करवेना, कडेवरचें मूल कडेवरच जोरानें आदळून व तें रडूं लागलें म्हणून गप्प करण्याकरितां त्याच्या पाठींत एक जोराचा धपाटा घालून ती म्हणाली—

" काय झालं रडायला ? नशिबीं रडंच आहे पुढं. काका मेला रडवायलाच बसला आहे. अन् बाप पण ! "

चुनिया उसळून म्हणाला—" तोंड बंद कर, नाहीं तर—"

डोळ्याला पदर लावून ती म्हणाली—" नाहीं तर काय ? मारून तरी टाका. माझं मेलीचं नशीबच असं. मेले दैत्यासारखे शेजारीं नांदतात, ते कसं सुखानं खाऊं देतील ? म्हटलं आज तरी वैरी जाईल. सहा महिने तरी ! पण नाहीं. माझं मेलीचं नशीबच खोटं ! "

हें बोलणें कोणाला उद्देशून आहे तें रामप्यारी समजली. प्रतिउत्तरासाठीं ती बसल्या जागेवरून ताडकन् उठलीहि. पण तिच्या नवऱ्यानें झटकन् तिचा हात धरला. हाताला लागलेली रग व नवऱ्याचे वटारलेले डोळे पाहून ती आपोआपच गप्प झाली. इतक्यांत धप् धप् धपके व जावेचें रडें तिला ऐकूं आलें. चुनिया बायकोला मारीत होता.

' आज असें झालें आहे तरी काय ? ' त्या दोघींच्याहि मनांत विचार आला. ' भांडणासाठीं नेहमीं तत्पर असलेले दोघेहि भाऊ, आज अशा कोणत्या मंत्रानें भारावले गेले कीं, स्वतः तर भांडत नाहींत, पण भांडणाला तोंड लावून दिलें असतांहि प्रतिपक्षाशीं न भांडतां आपापल्या बायकांनाहि भांडणापासून परावृत्त करतात ! आहे काय हें ? सुखिया रडत रडत म्हणाली,

" काय केलं मी ? मेल्या वैऱ्यांच्या रागावर मला कां मारतां ? "

" तूंच तूंच ह्या साऱ्या झगडयाच्या मुळाशीं आहेस. "

चुनियाचा स्वर होता तो. " हा सारा सत्यानाश तूंच केलास. भिकेला लागायची पाळी आली. वडिलोपार्जित वतन दुसऱ्यांच्या घशांत अर्धअधिक गेलं. तरी तुझे डोळे उघडत नाहींत ? वकील अन् सावकार आज आपसांत बोलत होते कीं, ' ज्यासाठीं हे बावळे भांडत आहेत ती जमीन तर बहुतेक आपल्या घशांत उतरली. राहिलेली हां हां म्हणतां येईल. जाते कुठें ? ताट गेलं तिथं कांठहि जाईलच. बोल. आणखी काय करायला पाहिजे ? "

रधिया व रामप्यारी अवाक् ऐकत होतीं. सुखिया तर स्तंभितच झाली. नवऱ्याचा हा नवा अवतार पाहून तीहि अवाक् झाली. तिला हा अनुभव नवीनच होता. तिच्या अभिमानाला हा अनपेक्षित फटका बसल्यानें ती रडूं लागली. रडत रडतच ती म्हणाली—

" माझे डोळे उघडेच आहेत, मेल्यानं आम्हांला भिकेला लावलं हें कधींपासून मला साफ दिसतंय. माझीं पोरं—"

" तुझीं पोरं ? अन् त्याचीं ? "

" त्याची एक दिवटी ? असली काय अन् नसली काय ? माझें कुळदीपक—"

" कुळदीपकाला निसाऱ्या–उसाऱ्यांचा वारा बाधला तर तें विझून—"

" इडा पीडा जावो अन् बळीचं राज्य येवो माझ्या बाळांना. असं वाईटबरं बोलणारी जीभ–"

सुखियाची जीभ अडखळली. ती रडूं लागली.

" कसा आंतड्यांना पीळ पडतो ! आपल्यावरून जग ओळखलं तर ? आपला तोच बाब्या करून बरं व्हायचं नाहीं. जनावरालासुद्धां माया असते पोरांची. तुझे मुलगे म्हणून तुला जास्ती, पण त्यांचीं पोरं त्यांना मुलाच्या तोलाचीं वाटलीं तर नवल आहे का ? बघ, तीं मांजरीचीं पिलं बघ, कशीं मानेवर मान टाकून निर्धास्त पडलीं आहेत ! एक शिकार दोघांपुढं टाकते मांजरी. तस्सं अगदीं तस्सं आमचं होतं. आईबापांनीं शेतांत खपावं अन् आम्ही भावाभावांनीं मानेवर मान टाकून घरांत निवाऱ्याला असावं. एकत्र खेळणं, एकत्र खाणं; दुजाभाव कसा तो नव्हता. पुढं एकमेकांना पाण्यांत पाहूं असं स्वप्नींसुद्धां नसेल कोणाच्या ! "

" स्वप्नीं नव्हतं तें प्रत्यक्ष घडलं आहेना ? घ्या तर मग ! "

" तुझ्यामुळं, चांडाळणी. हें सारं तुझ्यामुळं–तुह्मां बायकांमुळं झालं आहे हें सारं. " चुनिया त्वेषानें म्हणाला—

" आम्हांला मुलगे झाले अन् त्याची फक्त मुलगीच वांचली हा काय त्याचा गुन्हा ? मुलीवर त्यानें माया करूं नये ! बाबांनीं चांगली घराची, शेताची नीट सारखी वांटणी करून दिली होती. कांहीं भांडणतंट्याचं कारण होतं ? पण तुला लोभ सुटला अन् माझा विवेक सुटला ! आमचा नवल्या आजोबाशिवाय राहिना, म्हणून बाबांना आमच्याकडे ठेवलं, नाहींतर रघियाकडे–तो धाकटा मुलगा म्हणून–ते रहातच होते. आमच्या मुलांसाठीं त्यांना आमच्याजवळ ठेवलं, अन् त्यांच्या भरणपोषणाच्या खर्चाच्या भरपाईसाठीं रघियाच्या वांटणींतलं अर्धं शेत नवल्याच्या नांवं करून बक्षिसपत्रावर बाबांचा–आंधळया बाबांचा–आंगठा घेतला ! बापाला मुलं काय पोशीत नाहींत ? पण मला दुर्बुद्धि सुचली अन् तुझ्या चिथावणीला बळी पडून मी रघियाला अशा रीतीनें लुबाडलं. पण एवढ्यानं आमचं समाधान झालं का ? नाहीं ! राहिलेला पाव हिस्सा आम्ही लुबाडूं नये–त्याला मुलगा वारस नाहीं म्हणून आम्हीं टपलेलेच आहोंत–याकरितां त्यानं तो मुलीच्या नांवानं बक्षीस करून दिला. पण त्याला त्रास द्यायला आम्हीं हा दावा उभा केला. ह्या खोट्या खटल्याला रंग चढावा, त्याला शिक्षा व्हावी, त्याचं नुकसान व्हावं म्हणून खोटे साक्षीदार तयार केले, त्यांनीं खोटी साक्ष द्यावी म्हणून दारू गुत्तेदार ! एकना दोन. खोटीं कामं करण्यासाठीं वेळ अन् पैसा सांपडला. परिणाम काय झाला ? त्याच्या वांटणीचा जमिनीचा तुकडा सावकाराच्या घशांत गेला. आम्ही बाबांना फसवून घेतला तोहि त्याच मार्गानें गेला. अशा रीतीनें वडलांनीं रक्ताचा घाम गाळून कसलेली जमीन सावकाराच्या घशांत गेली. "

" कशाला जाऊं दिली ? "

" भावाला बुडविण्यासाठीं–त्याला मारण्यासाठीं, वकिलांच्या फीसाठीं गेली. "

" एवढं कळतंय तर मग घेऊन या ना. " सुखिया उपरोधिक स्वरानें म्हणाली.

" तुझ्या चिथावणीनं घालवली तशी ती आतां घेऊन येणं हातीं नाहीं. माशानं गिळलेलं माणिक कसं सांपडावं ! तें गेलंच. पण आतां आहे तें राखायचं. ज्याचं त्याला द्यायचं ! "

" म्हणजे ? "

" म्हणजे नवल्याचा अन् लैलाचा सारखा भाग–"

सुखियावर जणूं वज्र पडलें! ती रडत ओरडत म्हणाली—

" ओ माय, काय करूं आतां ? माझीं सोन्यासारखीं पोरं उघडयावर पडलीं. धन्याला वेड लागलं जनू. आतां कसं होईल आमचं ?' रघिया खटुलीवरून ताडकन उठला, व चुनियाच्या घराकडे निघाला. रामप्यारी घाबरली. नाकापर्यंत घुंगट ओढून ती नवऱ्याला मागें परतविण्याचा प्रयत्न करूं लागली. रघिया धांवत जाऊन भावाच्या पायांवर पडला. सद्‌गदित स्वरानें तो म्हणाला,

" मोटा भाई, भाभीला कशाला नाराज करतां ? लैली तुमच्या पायाची धूळ आहे. तिला फक्त आशीर्वाद द्या. तिच्यासाठीं—"

त्याला वर उठवून छातीशीं धरीत चुनिया सद्‌गदित स्वरानें म्हणाला—

" नाहीं बाबा, तिच्यासाठीं नाहीं. आमच्या नवल्यासाठीं. अन्यायाचा धडा त्याच्यापुढं आम्हीं ठेवला होता. त्याच्या अन् आमच्या कल्याणासाठीं त्यांत दुरुस्ती करीत आहें. "

---

# गुन्हेगार : : १२

पोलिसांनीं त्याला चतुर्भुज करूनच तेथें आणिलें. मीहि त्यांच्यांतच होतों. त्याची उंची चांगली सहा फूट असावी. अगदीं अस्थिपंजर देह, गुडघ्यापासून खालीं उघडे बारीक पाय, रुक्ष कातडी. मूळचा काळा वर्ण, मळाचीं पुटें चढून भुरकट बनलेला; जाड ओठाबाहेर आलेले दोन मोठे पिवळे दांत; त्यांवर राखी रंगाच्या राकट मिशा, नाकाचा दांडा व कवड्यासारखे डोळे. भेसूरच दिसत होती त्याची मुद्रा ! त्या नागर वातावरणांत जणूं एखाद्या भुतानेंच प्रवेश केला, असेंच वाटलें असेल लोकांना !

एके काळीं खाकी असलेली अर्धी इजार ( हाप पँन्ट ) तो नेसला होता. तिच्या पायाच्या दुमडलेल्या पट्टया फाटून खालीं लोंबत असल्यामुळें पायांना पायबंद घातल्यासारखें दिसत होतें. खांद्यावरून त्यानें एक मळकट पंच्याचा धडपा पांघरलेला होता. त्याचीं पुढच्या बाजूचीं टोकें आंतून दोन्ही हातांनीं छातीशीं घट्ट धरून ठेवल्यामुळें कमरेखालपर्यंत तें आच्छादन झालें होतें. आंत शिरतांच 'रामराम' करण्याकरितां त्यानें जेव्हां हात बाहेर काढले, तेव्हां पंचा बाजूला सरला आणि गळ्याच्या व खांद्याच्या पट्टीच्या आधारानें जेमतेम जीव धरून असलेला, अनेक ठिगळांचा सदरा दिसला. त्याचा मूळरंग कोणता हें ओळखणें सोपें काम नव्हतें.

त्याच्याकडे दृष्टि जातांच परिचय पटल्यासारखें मॅजिस्ट्रेटसाहेबांनीं कळेनाकळेसें स्मित केलें. त्यांच्या दृष्टिक्षेपांतच प्रश्न होता. जमादारांनीं पद्धतशीर सलाम करून कैफियत सादर करण्यास सुरवात केली.

"किरमिनल टाइपका आदमी है साब. रात्रीं गुन्हा करायच्या इराद्यानें लपत छपत फिरत असतां पकडला साहेब. म्हणून डिस्टिक पोलीस आक्ट कलम ६१ ( डी ) या कलमाखालीं माझी त्याच्यावर फिर्याद आहे साहेब."

पुन्हा पद्धतशीर सलाम.

कांहीं प्रश्न करून मॅजिस्ट्रेट साहेबांनीं गुन्ह्याचें स्वरूप समजून घेतलें.

"कांहीं शस्त्र होतें काय त्याच्या हातांत ?"

"नाहीं साहेब."

"घरफोडीचीं हत्यारें ?"

"नाहीं."

"कोणाच्या घरांत शिरतांना धरला?"

"जी, नाहीं."

"मग कशावरून गुन्हा करण्याचा उद्देश होता?"

"क्रिरमिनल टायपाचा मानूस है साब. रात्रीं हजेरी लावल्यावर नवाच्या फुडं त्याला बाहीर फिरायचा अखत्यार नाहीं साब!"

"अस्सं, कुठें मिळाला तुम्हांला हा!"

"रा. सा. देसायांच्या वाड्यापाशीं, झाडाच्या सावली सावलीनं वाकून, लपत छपत जात होता साब. बडी मुसिबतसे पकडा साब. हत्यारी पोलीसाला आरडर द्यावी लागली साब!"

फिर्यादीचा जबाब टिपला जात होता.

नंतर आरोपीकडे वळून मॅजिस्ट्रेटनें विचारलें, "तुझ्यावरील आरोप आतां तूं ऐकलास? यावर आतां तुझं काय म्हणणं आहे?"

दोन्ही हात जोडून घोगऱ्या आवाजानें आरोपी म्हणाला, "काईबी न्हाई, आता धा वर्स पाटवून द्या; यवडच पायाशीं मागनं हे सरकार! बस्स."

त्यानें हताशपणें हवेंत हात हालविले आणि राकट ओंठांवरून जीभ फिरविली. त्याचे निस्तेज लहान डोळे जरा लुकलुकले. सरलेला पंचा गळ्याशीं लपेटून त्यानें फाटक्यावर पांघरूण ओढलें, पण गेलेल्या अब्रूवर पांघरूण घालणें जसें निष्फळ ठरतें, तद्वत् त्याचा तो प्रयत्न फुकट गेला. उलट पांघरूण ओढून घेतांना फाटक्या सदऱ्यांत बोट अडकून तो अधिकच फाटला. त्या वेळीं तो कांहीं तरी पुटपुटला असें त्याच्या हालणाऱ्या ओंठांवरून दिसत होतें.

"हें न्यायासन आहे, हें लक्षांत घेऊन विचारलेल्या प्रश्नाचेंच फक्त उत्तर दे."

"जी."

"तुला रात्रीं बाहेर पडावयाला कायद्यानें मनाई आहे, हें तुला माहीत आहे कीं नाहीं?"

"जी, व्हय सरकार"

"मग, तूं रात्रींचा लपत छपत फिरत होतास? गुन्हा करण्याच्या उद्देशानें?"

"जी सरकार, गुन्या करन्यासाटी नाअीजी."

" मग कशासाठीं रात्रीं फिरत होतास ? "

त्यानें तिथल्या तिथें हातांची चाळवाचाळव केली, कावऱ्याबावऱ्या नजरेनें एकदा चहूंकडे पाहिलें, नंतर घोगऱ्या आवाजानें तो म्हणाला, " उगाच भाहीर पल्डो जरा. "

" रात्रीं बाहेर पडायचं नाहीं माहीत आहेना ? "

" जी, व्हय. "

" मग कशाला बाहेर पडलास ? आणि तूं आपलं नांव कां नाहीं सांगितलेंस ? "

" सांगितलं सरकार. त्येनी अिचारलं कोन ? त मी म्हनलों मी-मी म्हून ! "

' मी ' म्हणतांच ओळखूं येण्याइतकी आपण कोणी प्रसिद्ध व्यक्ति आहोंत, असें मानून आरोपीनें दिलेलें हें उत्तर ऐकतांच त्या गंभीर वातावरणांत हास्याची एक लाट पसरली. परंतु सरकारचा वारंवार पाहुणचार घेणाऱ्यानें सहज ओळखलें जाण्याची अपेक्षा बाळगल्यास आश्चर्य किंवा चूक कसली ?

" नहीं साब, ए झूट बोलता है. " विचारल्याशिवाय मध्येंच बोलायचें नाहीं या गोष्टीचें भान न राहून जमादार हिंदींत म्हणाले.

" ए बिलकुल झूठ बोलता है. इस्ने नाम तो नहीं बताया. लेकीन छुपते हुये भागने लगा. बडी मुसिबतसे पकडा साब. "

कैदी त्याच्याकडे डोळे रोखून पाहूं लागला. त्याला भेदून टाकण्याकरितां तो आपली सर्व शक्ति जणूं काय दोन डोळयांत केंद्रित करीत होता.

" ज्या अर्थीं तुला बाहेर पडावयाचें नसतां तूं रात्रीं बाहेर पडलास आणि बाहेर पडण्याचें कारण तुला सांगतां येत नाहीं, तूं लपत छपत पळत होतास, त्या अर्थीं आणि तुझे पूर्वीचे गुन्हे लक्षांत घेतां तुझ्यावर गुन्ह्याची शाबिती होत आहे. तुला तुझ्या बचावाचें कांहीं सांगावयाचें आहे काय ?

" काय सांगनार ? आन कोन आइकनार ? धनी ! " तो हताशपणें शंकित स्वरानें म्हणाला. " म्या गुन्या केला न्हाई. जरा कामासाठीं गेलों "

" तोच गुन्हा ! "

" त मग सरकार, धा वर्स द्या पाटवून ! आपल्या हातांत सत्ता हाये तवा धा वर्सं द्या पाटवून, मंग कदीचं न्हाई आसा गुन्या घडनार ! "

" शुः शुः, कोरटकी बेअदबी करता है ? "

काढणीला हिसका देऊन व दंडा हवेंत उचलून पोलिसानें कैद्याला शुद्धीवर आणलें. तेथें असलेले एक प्रतिष्ठित वकील सौम्यपणें म्हणाले, " अरे, असा त्रागा कां करतोस ? हें न्यायासन आहे. नीट खरं खरं सांग, म्हणजे तुझा न्याय होईल. अन्यायानें कोणी कोणाला कैदेंत पाठवूं शकत नाहीं. "

कैद्याचे डोळे जरा लुकलुकले. या बोलण्यावर विश्वास ठेवावा कीं नाहीं याचा जणूं तो मनाशीं विचार करीत होता. त्यानें क्षणभर हातांची चाळवाचाळव केली. कोरडी जीभ राकट ओंठांवरून फिरविली. त्याचे ओंठ ओंगण मिळालेल्या यंत्राप्रमाणें हळूहळू हालूं लागले. जणूं काय त्या यंत्रांत एखादें उत्तर तयार होत होतें. नंतर कांहीं तरी निश्चयावर येऊन तो घोगऱ्या आवाजानें एकदम म्हणाला, " मी–मी–तमाशाला गेलुं होतुं ! "

त्या गंभीर वातावरणांत पुन्हां एकदा हास्याची एक मोठी लाट पसरली. सर्वांचे डोळे आश्चर्यानें आरोपीवर रोखले गेले. त्याच्या या अनपेक्षित उत्तरानें सर्वांच्या मनांत निरनिराळे विचारतरंग उद्भवणें अगदीं साहजिक होतें. सरकारी नियंत्रणाखालीं असलेल्या त्याच्यासारख्या मूर्तिमंत दारिद्र्यानें व वार्धक्यानें तमाशाला जाण्यासारख्या गोष्टी कराव्या व त्या बेडरपणें सांगाव्या हें त्याचें वर्तन सर्वांच्या मनाला मोठें बेरडपणाचें वाटलें असल्यास नवल नाहीं; आणि कोणाच्या मनांत त्याच्याविषयीं यत्किंचित् अनुकंपेचा अंश उद्भवलेला असेल, तर तोहि या उत्तरानें समूळ नष्ट झाल्यास नवल नाहीं. पोलीस अर्थपूर्ण दृष्टीनें एकमेकांकडे पाहून हसूं लागले. कोणाच्या तोंडावर तिरस्कार, तर कोणाच्या तोंडावर आश्चर्याच्या छटा उमटल्या. सर्वजण एकमेकांकडे पाहून दृष्टिक्षेपांनींच आश्चर्य व्यक्त करूं लागले. जणूं काय 'या पिकल्या पानांत किती हिरवटपणा आहे ? अन्नाला मोताद होऊन मृत्युपंथास लागला तरी रंगेलपणा गेला नाहीं बेरडाचा ! ' हाच विचार सर्वांच्या मनांत त्या वेळीं आला असेल.

परंतु मला मात्र तसें वाटलें नाहीं. मला त्याचें तें उत्तर बनावट वाटलें. तो कांहीं तरी लपवितो आहे, आणि तें लहानसें कारण लपवून तो स्वतःवर मोठा आरोप ओढवून घेत आहे व त्या योगें सज्जनांची सहानुभूतीहि गमावून बसत आहे, असें वाटून मला त्याची कींव आली.

नुकता दीडदोन महिन्यांपूर्वी मी एक सुशिक्षित बेकार होतों. आणि बेकारीची आंच मला चांगलीच लागली होती. मनुष्यप्राण्याच्या किती तरी गरजा असतात.

कांहीं हौशी, एखादी तलफ, कांही आवडी, इच्छा, मनुष्यमात्रांना असतात आणि अशा क्षुल्लक भासणाऱ्या किती तरी गोष्टींसाठीं माणसाचें अडतें आणि मग गरजेपोटीं जसा कल्पकतेचा उगम होतो, तसा क्वचित् गुन्ह्याचाहि होतो मी बेकार असतांना एकदा असाच क्षुल्लक कारणानें कचाट्यांत सांपडलों होतों. चहाची सवय होती व वेळ झाली तशी चहाची तल्लफ आली. पण साध्या दिसणाऱ्या चहाला किती साहित्याची गरज लागते ? त्या साऱ्याच्या अभावीं नुसतें कागदावर पाणी ऊन करून तलफ भागविण्याचें मी ठरविलें. पण काडीपासूनच माझें अडलें. आतां काय करावें ? हें कोंकण थोडेंच होतें कीं, कोणाहि शेजारघरांतून विस्तव मागून आणावा ! हें शहरगांव होतें. ' आणायला नाहीं कोणी, ' या सबबीवर स्त्रियांना चार काड्या मागून आणतां येतात. पण मी पडलों पुरुष. काडीनें सत्त्व घालविणें मला प्रशस्त वाटेना. शेजारच्या घरीं पुढच्याच दालनांत पानसुपारीचें व विडीकाडीचें साहित्य सदा तयार असे. मी तेथून एक काडी उचलून आणायचें ठरविलें. एक काडी मी घेत-ल्यानें त्या घरचें कांहीं दिवाळें निघत नाहीं, किंवा मी चोर बनत नाहीं, असा माझा कयास होता. पण म्हणतातना " फट् म्हणतां ब्रह्महत्त्या. " तसें काडीचें कबूतर होऊं लागलें, तेव्हां काडी चोरल्याचा क्षुल्लक अपराध लपवून, विडी चोराऱ्यला आल्याचा नसता कबुलीजबाब द्यावा लागला मला ! यांत मी माझ्या मनानें फक्त खोटेंच बोललों असेन, पण जगाच्या दृष्टीनें चोर व व्यसनी ठरलों. याचा परिणाम व्हायचा तोच झाला. मला ती चाळ सोडावी लागली. तेव्हां मला पटलें कीं, शक्य तितक्या लौकर बेकारी घालविली पाहिजे. बेकारीच्या अंगीं सर्व दोष संभवतात.

मी माझ्या शिक्षणाचें गांठोडें दूर ठेवून मिळेल ती नोकरी पत्करण्याच्या निश्च-यावर आलों. आणि आतां स्वतः गुन्हा करण्याऐवजीं गुन्हेगार शोधण्याच्या कामगिरीवर मी आहें. माझ्या या नवीन पेशाप्रमाणें अद्यापि मला शिस्तींत पात्र-लेंहि टाकतां येत नाहींत, तरी गुन्हेगाराला चवाठ्यावर उभें करण्याचें काम मी चोख बजावतों.

सदरहू आरोपीवर रात्रीं पहारा करण्याचें काम माझ्याकडे होतें. त्याचा शेवटचा कबुलीजबाब ऐकून सर्वांच्या मनांत काय विचार आले असतील ते असोत;

पण माझ्या डोळ्यांपुढें माझ्या गत जीवनांतील तो प्रसंग चटकन उभा राहून त्याच्याबद्दल माझ्या मनांत दयेची भावना उद्भूत झाली.

ज्याच्या हाडांवर फक्त रुक्ष कातडीचें पातळ आवरण आहे, ज्याचें पोट पाठीला चिकटलें आहे व ज्याच्यावर पोलिसची सारखी नजर आहे, असा मनुष्य तमाशा पाहण्याची चैन करील ? शक्य वाटेना मला. मग काय ? चोरी ? पोटासाठीं चोरी ? शक्य आहे. आणि म्हणूनच तो म्हणतो, 'दहा वर्षं पाठवा.' निदान पोटाची तरी ददात मिटेल. तमाशाच्या व्यवस्थापकाची साक्ष काढण्याचें ठरल्यामुळें खटला पुढील तारखेपर्यंत तहकूब झाला. आणि अस्थिपंजर आरोपीला काढणीपहाऱ्यानिशीं कोठडींत पोचवून मी उत्सुकतेनें रात्रीची वाट पाहात राहिलों.

* * *

"घेई घेई माजे वाचं । गोड नाम इट्टोबाचं
डोळे तुमी घ्या वो सुक । पा वो इट्टोबाचं मूक
तुमी आइका वो कान । माज्या इट्टलाचं गानं"

मी तर स्तंभितच झालों हें ऐकून. रात्रीं मी ड्यूटीवर दाखल झालों तेव्हां कैदी वरील अभंग, गात होता म्हणण्यापेक्षां, आपल्याशींच हळू हळू तो गुणगुणत होता. भावनेनें माझें हृदय हाललें. नकळत माझे डोळे ओले झाले. अरेरे, ईश्वराला आपलासा करून घ्यायला सर्वावयवांना विनविणारा हा माणूस—कैदी म्हणवेना मला—जगामध्यें जन्माचा गुन्हेगार ठरलेला आहे. मग खरें काय ! खरोखरच हा बेरड असेल का ?

मी कोठडीच्या दारावर टकटक केलें. कैद्याला वाटलें मनाई हुकूम आला. "देवाचं नांव पर घेवूं देऊं नुका," असें पुटपुटत त्यानें अभंग म्हणणें बंद केलें. काय हा विपर्यास ? पण जग त्याच्यावर विश्वास ठेवायला मुळींच तयार नसतां त्यानें तरी कसा विश्वास ठेवावा कोणावर !

कोणत्या तरकिबीनें मी त्याच्याशीं संभाषण सुरू केलें, हें माझें गुह्य मी कोणाला सांगूं इच्छीत नाहीं. पण काय भाषण झालें तेवढें मात्र सांगतों. आधी त्याच्या विश्वासास पात्र व्हायला मला कांहीं काळ खर्चीं घालावा लागला. आणि जेव्हां विश्वास पटला, तेव्हां तो आधीं ढसढसा रडला. बोरूचें बन वावटळींत सांपडल्यावर जसें खिळखिळून हालतें, तसे हुंदके आंतल्या आंत दाबतांना त्याचीं हाडें गद्गदून

झालली. जीवितौघ घसरणीला लागल्यापासून आजच प्रथम सहानुभूतीचा शब्द ऐकत होता बापडा!

'मी चांगला पट्टेवाला होतों तुमच्यासारखा, धनी!"

बिनवारशी मालाचें कोणीहि धनी व्हावें, तसें कोणाहि माणसाशीं बोलतांना तो स्वतः सेवकाचें नातें पत्करीत असे.

"धन्याच्या लेकाच्या कमरतली सोन्याची साकळी गेली, आन ती तोहमत मजवर आली. चांगली दीड वर्ष सारखी खडी फोडीत व्हतों धनी! हाडांचा आक्षी चुराडा झाला. सुटून आलो त कोन दारीं उबं करतुया? धन्याकड दुसर नोकर व्हत, त्येनी सांगितलं, 'साकळी गमावली नव्हती. घरांतच कुट डाव्या हातानं ठिवली व्हती, ती मंग गावली. पर मंग काई उपेग न्हाई म्हून धन्यानं सरकारांत कळिवलं न्हाओ.'

"हें आयकून लई वंगाळ लागलं मला, मी गेलों धन्याप, आन माज हाल सांगितल, आन नोकरी देया हात जोडून इनिवलं. पर त्येला घाम आला न्हाई. मी म्हनलों, घरांतच साकली आसून माझ्यावर आळ घेतला, मला मानसांतून उटिवलं. माजी बायकोपोरं अन्नाबिगार तडपडत्यात. तुमी शेरावून उटिवलं, आता तुमीच शेराला लावा. माजी आब्रु तुमी खराब केली. आता भाइर कुनी दाराशीं उब करिना मला. तुमी जर माजी दाद घेत नाई तर सरकारांत सांगन मी—"

"झालं, त्येनच सरकारांत सांगितलं जाऊन, "आमच्या घरीं घ्यादिसा येवून धमक्या देतो" म्हून. झालं, तिथपासून नदर राहू लागली माज्यावर. लोक म्हनूं लागले, गरीब लई हारामी असत्यात. सरकारनं गरीब जातीला नोकऱ्या लावाव्या म्हजी त्ये चोऱ्यामाऱ्या करनार न्हाईत असा ठराव केला, तवा त्ये ज्यास्तीच चोऱ्या करायला लागल. कावळा दरबारी बसवला तरी दुसरं काय करनार? बोलून चालून गुन्हेगार जात!'

"मानहानी! मानहानी. जिकडं तिकडं इनाकारन मानहानि. एकल्याची नव्हं. समद्या जातीची. आन जातींत बी तोंड काडाया कुट जागा व्हती? जातवालं म्हनूं लागलं, 'तुज नांव सरकारदरबारी चोरांत दाखल झालं, आम्ही न्हाई तुजी पोरगी आपल्या पोराला करायचे!'

"मी पर मानुसच व्हतों. सईन व्हईना मला. एकुलती एक पोर तडपडली आन्नाबिगार. वाग म्हनलं तरी खातु आन वागुब्बा म्हनला तरी खातु. मंग

वाग्याच का म्हनूं न्हाई ? केला निच्छे मनाशी. ज्यान माज ईकत नुस्कान केल त्येला दावायचा एकदा चांगला हिस्का ! म्या धन्याचं घर फोल्डं. माजा चोरी करण्याचा इचार व्हता. पोरीसाटी चोरी करनार व्हतो. पर त्येला पाईल्यावर ह्यो ईचार ऱ्हाईला न्हाई. त्येला ठार करूंसा वाटलं जिवाला. आन हातातली प्हार उगारली असतां मी गावलों. मंग काय इचारतां. गेलों सा वर्स खडी फोडाया, चक्की पिसाया, घानी वडाया, काय आन काय ? मानसानी मानसावर केल्यालं जुलुम आयकवनार न्हईत मानसाच्यान. सुटून आलों त काय हाय माजं जगांत ?

"माजं खोपट ग्येलं, माजी रत्नी गेली, आन् माजी पोर चंद्रीबी समद समद माजं जे काई व्हतं ते समद ग्येलं. एक ऱ्हायली माजी म्हतारी माय. आक्षी उमेदींत मला म्हातारकळा आली. माज्या म्हतारीनं भाकर–तुकडा मागून आनावा आन म्या तरन्यानं खोपटांत बसून खावा. मला ना चाकरी ना उद्येग. रिकाम्या डोक्यांत काय म्हून विचार येत न्हवत ? माजी तरनीताठी बायको रत्नी, माजी नखित्रासारी पोर चंद्री. कुट आसत्याल ? काय करीत असत्याल ? त्या देवाला ठावं.

"काओ आसलं तरी मनुक्षाच्या पोटाला व्होवं. मद्यानीची येळ म्होटी कटीन आसती. माजी त 'माय जेवूं वाडीना आन् बा भीक मागू दिना', तशी गत झालेली.

"शिरीमंताच्या बुटाला त्याच रंगाची दोरी व्होवी. आन जसा कोट आसल, त्येला सोबसी गळपटी आन दुसरं सारं होव्हं. त्याशिवी मानसांत जान्यासारा मानुसपना येत नाओ म्होव्या लोकांला. मंग त्या मानान गरीबाच्या पोटाला वलीकोरडी भाकर त व्होवी ? पर सा वर्स जाऊन माजी रग जिरली व्हती. एक एळ म्हातारी माय मागून आनी, त्येवर दोगांचं पोट भागवायचं. व्हतां व्हतां चोरी हाच माजा पोटाचा धंदा होऊन बसला. पोटाला नसल तवा चोरी करावी. कुटइ कवाबी चोरी मारी झाली का मलाच धरनं यावं. इटोबाची मर्जी. तो ठिवील तसं ऱ्हानं भाग."

त्यानें हात जोडून दीर्घ निश्वास टाकला. त्याची कहाणी ऐकून माझा जीव थरारून गेला. मी त्याला माझी शंका विचारिली.

"पण गड्या, परवां तूं कांहीं चोरी करायला गेला नव्हतास ?"

त्यानें नकारार्थी मान हालविली.

" आणि तमाशालाहि नाहीं ? "

पुन्हा नकारार्थी मान हालली.

" मग खरं खरं सांग गड्या ! तूं कुठं गेला होतास ? ' माझी खात्री आहे कीं, तूं कांहीं वाईट कामाला गेला नव्हतास. होयना ? मग खरं खरं सांगून तूं मोकळा कां नाहीं झालास ? "

माझ्या सहानुभूतीच्या शब्दांनीं तो ढसाढसा रडायलाच लागला. आणखी थोडें सांत्वनपर बोलल्यावर तो हुंदके दाबीत म्हणाला,

" कसं सांगावं धनी ! गरीब झालों–मानसांतून उटलों तरी— "

" तरी काय ? "

" आमची आब्रू ! "

" आँः ! "

माझ्या तोंडून आपोआप आश्चर्योद्गार निघाला. माझ्या हातांत त्याला बिनशर्त सोडून देण्याबद्दलचा हुकूम अचानक पडला असता तरी मी इतका दचकलों नसतों. मी आश्चर्यानें विचारलें " काय ? अब्रू ! "

" हां धनी ! आपला आयेब आपल्या हातानीं कसा उगडा करावा ? "

काय आश्चर्य! गुन्हेगार जातींत ज्याची गणना, चोरी हा पोटाचा धंदा, तुरुंग हेंच ज्याचें घर, बाहेर असला तर रोज हजिरी हा व्यवसाय, अंगांत त्राण नाहीं, केवळ लज्जारक्षणाला सुद्धां अपुरीं पडतील, इतकींच लक्तरें अंगावर, पोट पाठीला चिकटलेलें, अशा भेसूर भुतासारख्या अवतारानें तुरुंगाच्या कोठडींतून मला अब्रूच्या गोष्टी सांगाव्या ? आतां याची अब्रू आणखी कुठें राहिली ? मी आश्चर्यानें अवाक् होऊन पाहतच राहिलों त्याच्याकडे. उमजच पडेना मला. पण माझ्या मनाच्या गोंधळाचा त्याला उमज पडला असावा. तो चांचरत चांचरत कोणी तिसऱ्यानें ऐकूं नये इतक्या बेताच्या हळू आवाजांत म्हणाला,

" माजी पोर चंद्री ! याकुबच्या तमाशांत आली म्हून आईकलं. यवढी पायलेली. तशी आंतरली मलां. धनी ! पोर उडून गेली, तिच्या जन्माची नासाडी झाली; पर बापाचं आंतडं हैना ? पोटतिडीक म्होटी कटीन आसती ! तिला

डोळं भरून पगाया गेलों व्हतों. माजी चंद्री ! कशी आक्षी चांदनीवानी चमकत व्हती ! हाय, हाय."

मुलीच्या दर्शनानें आनंद आणि दुःख हीं सारख्याच प्रमाणांत त्याला जाणवत असल्यासारखें दिसलें.

"मग तूं—"

कांही तरी बोलायचें. पण तें कांहीं तरी काय बोलावें, हें न उमजून मी कांहीं तरीच प्रश्न केला.

"आता काई भ्या न्हाई ! पोरीला डोळं भरून बगितली यकदा. मनाची विच्छा पूर्न झाली. आता हीं हाडं कुटबी पल्डीं तरी चिन्ता न्हाई. मपल्या बचावापायी पोर उठून गेली हें जनाला सांगून आब्रु गमावनं नग ! ! !"

बये अन्नू ! धन्य तूं ! ! त्रिवार धन्य ! ! !

---

# स्त्री : : ११

तसें म्हटलें तर मी कांहीं वाईट गोष्ट बुध्द्या केली होती असें नाहीं. जें कांहीं केलें होतें, तें रूढ नियमांना धरून कायदेशीरपणेंच केलें होतें. परंतु त्याचा जो परिणाम झाला, त्यामुळें मनःस्थिति कांहीं ठीक नव्हती आज. डोक्यांत जे कांहीं विचार थैमान घालीत होते, कानांत जे प्रतिध्वनि उमटत होते आणि हृदयांत जें स्पंदन चाललें होतें त्यांचा उच्चार मनांतल्यामनांत करायलासुद्धां लज्जा वाटत होती, दुःख वाटत होतें. काय वाटत होतें, आणि काय नाहीं याचें वर्णनच करतां येत नाहीं. विचार तर इतके भराभर व गर्दीगर्दीनें येत होते कीं, त्यांच्या लोंढ्यानें डोकेंच फुटून जातें कीं काय असें वाटत होतें.

* * *

"छी, छी. किती लाजिरवाणी विषमता ! किती स्वार्थांधता ! हें सारें नाहीसें झालें पाहिजे. मोडून तोडून पार नष्ट केलें पाहिजे. तरच मानवजातीचा तरणोपाय आहे. 'सुधारणा झाली आहे !' 'कसली सुधारणा ?' जिकडे तिकडे भीषण विषमता भरली आहे नी म्हणे सुधारणा ! फाटक्या वस्त्राला किती नी कुठें कुठें ठिगळें लावणार ? तें कांहीं नाहीं. हें रूढीचें जीर्ण वस्त्र फाडून तोडून फेंकूनच दिलें पाहिजे. 'नवी विटी, नवें राज्य' असें झालें, तरच कांहीं तरणोपाय आहे. नाहीं तर या स्वार्थांधतेवर आधारलेल्या विषमतेपायीं मानवजातीचा समूळ नाशकाल समीप आलाच म्हणून समजा.

ओः, अरेरे; हें काय ? हें काय ? आला, आला, प्रलयकाल समीप आला. पंचमहाभूतांनीं काय हें उग्रस्वरूप धारण केलें आहे ! काय हा भीषण अंधःकार पसरला आहे ! डोळ्यांत बोट घातलें तरी दिसणार नाहीं. वायूनें हें कसलें तांडव नृत्य आरंभलें आहे ! अरेरे, निसर्गाच्या या दिवळ्या बाळाच्या लीलेनें ह्या केवढ्या मोठमोठाल्या इमारती कशा जमीनदोस्त होत आहेत. वाडे मनोरे उध्वस्त होत आहेत. मोठमोठाले वृक्ष उन्मळून पडत आहेत. काय ही भीषणता ! अशा या प्रलयकालीं कुठलें माझें घर नी दार ! एका प्रबळ वातचक्रानें मला कुठल्या कुठें नेऊन टाकलें ! अरेरे, काय हें ! किती शतकांचें कलाकौशल्य, वैभव, संस्कृति सारें सारें नष्ट होत आहे. मानववंश, सारी जीवसृष्टि—अरेरे, कोणत्या अशुभ वेळीं मी

प्रलयकालाचें स्मरण केलें न कळे. फुटायला आलेले डोळे गच्च मिटून धरले तरी हें दृष्टीआड होत नाहीं आणि ही विद्युल्लता मध्येंच लळलळा लवून पहा कशी बळेंच हें सारें भीषण दृश्य पहावयास लावीत आहे! जणूं काय खदखदां हांसून म्हणते आहे, 'क्षुद्र मानवा! भोग आपल्या इच्छेचीं फळें.'

"बाई चपले, बा प्रलया, या अनाथ आणि असहाय अबलेला एखाद्या पाचोळ्यासारखी इकडून तिकडे कां फेंकीत आहां बरं? माझ्या नाशासाठीं तुम्हांला काय निराळी शक्ति खर्च करावी लागणार आहे? या ना, आपल्या एका कराल-स्पर्शानें माझा एकदांचा निकाल लावा. आतां नाहीं हें सोसवत. अखिल जीवसृष्टींत मानवजात म्हणजे—त्यांत मी स्त्री-अबला-एकाद्या धूलिकणाइतकें तरी महत्व मला आहे का? मग कशासाठीं मला वांचवितां आहांत?"

ताशानगाऱ्यांच्या रणभेरीमध्यें सनईसारखे कोमल सूर कोणाचे हे? एक स्त्री! अबला? असहाय अबला! शीत-वात-निवारणार्थ-कसलें? लज्जारक्षणासही अपुरें असें जीर्ण लक्तर तिच्या कमरेला होतें. कर्दळीप्रमाणें ती कांपत होती व मृत्यूला बाहत होती. आणि तो सर्वभक्षक आपल्याला अवमानीत आहे असें समजून, स्वतःचा धिःकार करीत ती एका जोरानें हेलकावे खाणाऱ्या वृक्षाखालीं उभी होती. जणूं काय वायु किंवा वीज त्या वृक्षाचा नाश करतीलच व त्याच्या नाशाबरोबर आपणासही मोक्ष मिळेल, अशी तिला आशा वाटत असावी.

अशा प्रळयसमयीं त्या असहाय अबलेनें जगावें असें मला तरी कसें वाटेल? 'देवा तिचा शेवट कर' अशी प्रार्थना मी मनांतल्यामनांत करतों न करतों तोंच—
"टँहा अ! टँहा! टँहा!"

कसला हा आवाज? बालकाचा रुदनध्वनि! भास तर नव्हे? नाहीं नाहीं. तें पाहा एक सुंदर गोजिरवाणें तान्हें! अट्टाहासानें टँहा, टॅहा करीत आहे. हायरे बाळा, तुझ्या जन्माला काय ही अशुभ वेळा! याचें रक्षण कसें होईल देवा!

कानठळ्या बसण्यासारखा मोठा कडकडाट झाला आणि मी समजून चुकलों कीं, त्या दुर्दैवी प्राण्यांचा अंत झाला. पण डोळे दिपविणाऱ्या विजेच्या प्रकाशांत मला दिसलें कीं, ती स्त्री त्या बाळाकडे धांवत आहे आणि म्हणत आहे, 'मृत्यू, दूर हो, दूर हो, मला जगायचं आहे! मानवजातीच्या अवशेषासाठीं मला जगायचं आहे. त्याला वाढवायचं आहे,' आणि दुसऱ्याच क्षणीं तिनें त्याला आपल्या हृदयाशीं धरून आपल्या उघड्या देहाच्या कमानीखालीं त्या चिमण्या जिवाला झांकून घेतलें.

" माझ्या बाळा ! प्रलयाच्या महापुरांत समूळ मानवजात नष्ट झालीरे ! मानव-वंशाचा आतां तूंच एकुलता एक अंकुर ! बाळा, मला तुझं जतन केलं पाहिजे. जीवाच्या मोलानं जतन केलं पाहिजे. किती मी स्वार्थी ? मरणाला कवटाळीत होतें. आतां नाहीं ग बाई मी मरणार ! मला बाळाला वाढवलं पाहिजे ! "

असें बोलून तिनें बाळाला अधिकच कवटाळलें आणि तो चिमणा जीव—ज्याच्या इवल्याशा डोळ्यांत तो भीषण देखावा मावणेंही अशक्य—तो चिमणा जीव, त्या बालेकिल्ल्याच्या आश्रयानें आपल्या चिमुकल्या मुठी हालवून जणूं प्रलयाला म्हणत आहे—

" आतां मी तुला मुळींच भीत नाहीं. कितीहि उग्र रूप धारण करून ये. माझ्या या बाळमुठींनीं मी तुझें चूर्णविचूर्ण करून टाकीन ! "

माझ्या तोंडून आपोआपच उद्‌गार निघाले. " धन्य, माते धन्य ! मानवतेवर केवढे तुझे उपकार हे ! "

नित्याच्या सरावाप्रमाणें मी आनंदानें टाळया वाजविणार, तोंच झंझावातासरसा कुणीकडच्या कुणीकडेच मी फेंकला गेलों ! भयानें गच्च मिटलेले डोळे किलकिले करून पहातों, तों खालीं केवढा अथांग समुद्र खवळलेला ! जिकडे तिकडे पर्वतप्राय लाटा नी वर काळेंभोर आकाश. समुद्राची रौद्रगर्जना तर मेघगर्जनेला मागें सारीत होती. आपले प्रचंड बाहू पसरून समुद्र जणूं यच्चयावत् वस्तुमात्राला कवटाळून खाऊं कीं गिळूं करीत होता. अशा त्या भयंकर स्थळीं एक तरुण आपलें क्षुद्र होडकें आवरण्याचा निष्फळ प्रयत्न करीत होता आणि लाटांच्या माऱ्यानें तें होडकें शेवटीं फुटून आतां एक रुंदसें फळकुट मात्र उरलें होतें. समतोलपणा राखणें अशक्य झाल्यानें आतां तें लाटांच्या माऱ्यानें समुद्रापोटीं गडप होणार; इतक्यांत एक तरुणी धांवत तेथें आली. जणूं लक्ष्मीच अवतरली. आणि तिच्या दराऱ्यानें समुद्राच्या अवखळपणालाही जरा आळा बसला. मोत्यांच्या जाळीच्या पायघड्या पसरणाऱ्या रत्नाकराकडे दुर्लक्ष करून तिनें त्या तराफ्याच्या दुसऱ्या टोंकावर उडी मारली आणि आपली बैठक स्थिर करीत ती म्हणाली,

" असं काय तें ? असा धीर काय सोडायचा ! बघा आतां झालं कीं नाहीं समतोल ! छे बाई ! माझं वजन अपुरं ! इकडं सरायचं गडे जरा. हं, पुरे; मघाशीं तिकडंच जरा वजन झाल्यामुळं मीसुद्धां कलंडणार होतें. आतां पहा, झालं कीं नाहीं समतोल ? "

त्यांनीं किनारा गांठला. माता जशी एखाद्या रुसलेल्या मुलाची समजूत घालते, तशी ती त्याला कुरवाळून हसून बोलत होती. अंगावरलें एकुलतें एक पटकूर पिळून झटकीत असतां तो खिन्नपणें म्हणाला-" माया, उगाच कां मला वांचवलंस? गेलों असतों तर बरं नसतं कां झालं?"

त्याच्या तोंडावर तांतडीनें हात ठेवीत ती म्हणाली,

" पहा हं, असं अभद्र नाहीं बोलायचं. "

" परिस्थिति बोलायला लावते आहे. सोन्यासारखे जीव, त्यांना ना पोटभर अन्न देतां येत. नाहीं आंगभर वस्त्र. अपुरी प्राप्ती—"

" असूं या. आतांच पाह्यलंत ना? खवळलेल्या भरदर्यांतसुद्धां समतोल-पणाच्या जोरावर आपण तरून आलों. मग तसं जगांतसुद्धां एकमेकांच्या साह्यानं नाहीं का सांवरून वागतां येणार? मघां जरा माझ्या बाजूला वजन कमी झालं, तेव्हां जरा जवळ सरकून सारखं केलंत तसं—हो! बोलून चालून मी अबला! तेव्हां संसारांत कुठं माझं कमी पडेल तें सांवरून—"

तिच्या गालावर टिचकी मारून तो म्हणाला—

" समजलं, समजलं; पुरे आतां ब्रह्मज्ञान. "

ती हंसत हंसत म्हणाली-" मग कां वेडेपणा? आपण दोघं एकमेकांचे पूरक आहोंत. हातांत हात घालून समतोलपणानं चाललों तर जनलोक अन् परिस्थिति किती कां दर्याप्रमाणं खवळलेलीं असेनात; आम्हाला त्यांची दिक्कत् नाहीं. गरीबी-गरिबीचं काय एवढं घेऊन बसलांत? लोक भात खातील तर आम्हीं पेज जेऊं. म्हटलं आहे ना? 'वाढतील बाळ तर फेडतील काळ.' आपण आपल्या बाळांना जीव लावून वाढवूं या. जें आपल्याला हवं हवंसं वाटतं, ज्याशिवाय आपलं अडतं नडतं तें त्यांना शिकवून-सवरून सोपं साधेसं करूं या. आहे काय त्यांत?"

त्याचा खिन्नपणा पळालेला पाहून ती मोहकपणें हंसली. त्यांना हातांत हात घालून जातांना पाहून मला बोलल्याशिवाय रहावेना. मी म्हणालों, 'खरी अर्धांगी.' आणि टाळ्या वाजवायला मी हात जुळले तोंच ते कोणीतरी धरून मला दूर ओढून नेलें.

माझ्या देहावर कोणत्या अज्ञात शक्तीचा अंमल चालत होता व ती मला कशी, कोठें, कां फिरवीत होती न कळे. पण मी जेव्हां माझे डोळे उघडले, तेव्हां मध्यें किती काळ लोटला होता देव जाणे. मी पाहूं लागलों तों मोठें चमत्कारिक

दृश्य दिसलें मला. एक वृद्धा–मुद्रा ओळखीची वाटते, पण ओळख पटत नाहीं. कोण बरें ही ? अं, मायादेवी तर नव्हे ? हो, तीच ती. शंकाच नको–एका स्फुंदून स्फुंदून रडणाऱ्या तरुणीला हृदयाशीं धरून अश्रुपात करीत होती. आणि दुसरी एक तरुणी सहानुभूतिशून्य नजरेनें दारांतून तें दृश्य पहात होती. इतक्यांत एक तरुण खाडखाड बूट वाजवीत तेथें आला आणि करडेपणानें म्हणाला–" मग काय ठरलं आई ! कधीं जाणार ही ? "

" कुठं जाईल बाबा ! जशीं तुम्हीं दोघं तशी ती. राहील तुमच्यांतच–" वृद्धा डोळे पुसून म्हणाली.

" म्हणजे ? तिच्या सासरीं काय भीक लागली आहे ! दीर चांगले बोलावतात–तें टाकून–नी आमची तरी काय श्रीमन्ती उतू चालली आहे ? शिवाय, आम्हीं तरी काय काय करावं ? भावाचं शिकणं, घरांतलीं दुखणींबहाणीं; पुढें आमच्या मुलांचं—"

" बाबा ! तिच्यासाठीं कांहीं निराळं करायला नको. माझ्या पोटाला जी एक भाकरी घालाल, त्यांतलीच अर्धी तिला देईन, दिराकडं जाणं तिला हिताचं नाहीं बाळ—"

" होय रे दादा—"

ती तरुणी–त्याची बहीण–मध्यें रडत रडत म्हणाली. परंतु दारांतील तरुणीनें–त्याच्या पत्नीनें–नापसंतीदर्शक मान हालविलेली पाहून डळमळीस आलेलें अवसान एकत्रित करीत तो म्हणाला,

" नाहीं आई, तें बरं नाहीं. जिकडचं तिकडे असलेलंच बरं. ही आधींचीच आहे लाडकी. त्यांत नवऱ्याबरोबर एकटी राहून स्वतंत्र वागलेली. आतां तुझी फूस, म्हणजे तिचं माझ्या बायकोशीं नाहीं पटलं तर उगाच शोभा—'

" आणि कमीजास्त कांहीं झालं तर जबाबदारी कोण घेईल ? "

ती तरुणी उद्गारली.

शब्द अगदीं साधे व मोजकेच. पण ते उच्चारण्याची पद्धत व त्यायोगें ध्वनित होणारा अर्थ लक्षांत येतांच ती रडणारी मुलगी स्तिमितच झाली. तिचा भाऊ पुढें म्हणाला,

" खरं आहे, नकोच तें; तिला उद्यांच पाठवून दे. तिच्या दिराची गाडी येणार आहे. "

एवढें बोलून उत्तराची वाटही न पहातां तो बूट खडखडावीत आला तसा निघून गेला. ती तरुण विधवा—त्याची धाकटी बहीण! भाऊभावजयींचे शब्द तिच्या कानांत घुमत होते. प्राण गेला तरी आश्रयासाठीं याचना करायची नाहीं अशा निश्चयानें ती निश्चल बसली होती. तिला कुरवाळून आई म्हणाली,

"बेटा, माझ्या मायेचं पांघरूण तुला अपुरं पडलं! माझं चालत होतं तोंवर तुम्हां मुलांत मी तर भेदभाव केला नाहीं. सगळयांच्या पुढ्यांत सारखंच वाढलं. म्हटलं, 'वाढतील बाळ अन् फेडतील काळ.' मला काय टाऊक कीं, माझीं मुलं उजव्या हातानं डावा हात तोडूं धजतील—

"जाऊं दे आई. माझं दैवच खोटं."

"बायकोचं ऐकून बोलतो आहे. म्हणत होता—दागदागिने कांहीं घेऊन आली नाहीं."

"जन्मघरीं निदानीला आसरा मिळत नाहीं आई, तर सासरधरून दागिने आतां कसे मिळणार?"

"निम्मा वांटा असो, पण दागिने तर द्यायचे दिरानं?—सारा जन्म कशाच्या आधारावर जाणार, हा कांहीं विचार? तेव्हां तिथंच दिवस काढल्यानं जनलाजेसाठीं देईल कांहीं असं त्याचं म्हणणं."

दीर्घ निश्वास टाकून हुंदके देत ती म्हणाली,

"समजलं. सारा जन्म घालवला त्या घरांत पोटच्या पोरीला आसरा देण्याचा अधिकार तुला नाहीं आई. मग पांच सहा वर्षांच्या ऋणानुबंधानें दागिने उचलून आणण्याचा हक्क मला कसा मिळेल? तें कांहीं नाहीं. सारं मनूच्या कायद्याप्रमाणं होतं आहे!—"

आई रडत रडत म्हणाली—

"जिथं तिथं मनु! जिथं तिथं मनु! बायकांच्या हक्काची कांहीं गोष्ट निघाली कीं तिथं आपला हा मनु हजर! तो मनू का जनू मला जर भेटता तर त्याला खडसावून विचारलं असतं कीं, बायकांच्या बाबतींत तुझ्या वचनाच्या आधारानं पावलं टाकणाऱ्यांच्यासाठीं एवढं तर लिहावं होतंस कीं, काळवेळाप्रमाणं बायकांच्या बाबतीचे कायदे बदलावे."

"निदान सतीची चाल कालत्रयींही बंद करूं नये, एवढं तरी घडतं तरी बरं झालं असतं!"

बिचारी असहाय आई आणि असहाय मुलगी. मानेवर मान ठेवून मनसोक्त रडल्या आणि तशाच झोंपल्या. भरल्या घरांतील कामकाजाच्या रगाड्यापुढें त्यांच्या जेवणाखाणाची चौकशी करायला कोणाला सवड असणार ? मुलगी काय समजायचें तें समजली. सारें भविष्य जणूं चक्क तिच्या डोळ्यांसमोर उभें राहिलें. त्या विचारांतच ती मागील दारीं असलेल्या विहिरीच्या आश्रयाला गेली. माझ्या हें लक्षांत येतांच मी तिला मागें ओढण्यासाठीं हात पुढें केले, पण व्यर्थ. तिचा झोंक आधींच गेला होता. मी हळहळून म्हणालों– " अरेरे, काय ही विषमता ! पुरुष तर असोच, पण स्त्रियाच स्त्रियांच्या किती विरुद्ध आहेत ! 'नरेंच केला हीन किती नर !' छे, छे, हे सारे प्रकार बंद झालेच पाहिजेत. "

* * * *

आवेशासरशी मी जोरानें मूठ आपटली, आणि डोळे उघडले तों माझी पत्नी मला हालवून म्हणत होती—

" मघांपासून एकसारखं काय झोपेंत बडबडतां आहां ? स्वप्नबिप्न पडलं वाटतं–! "

सर्व घटना आकलन न झाल्यामुळें मी म्हणालों.

" अँ:, हो. नाहीं. "

" अजून स्वप्नाचाच अंमल दिसतोय ! तोंडबिंड धुवावं, तोंवर मी चहा सांगून येतें. "

माझी पत्नी गेल्यावर जरा मला हायसें वाटलें व ती लौकर परत न येईल तर बरें असें मला वाटूं लागलें. नी झालेंही तसेंच. कालच्याच 'केस ' मधील त्या मुलीच्यातर्फे पुढें काम चालविण्याकरितां वर्गणी गोळा करीत असलेल्या कांहीं स्त्रिया, तिच्याकडे वर्गणी मागायला आल्या होत्या. आणि ज्यानें विरुद्ध निकाल दिला त्याच्या पत्नीनें या कामीं वर्गणी देणें कसें इष्ट नाहीं, हें ती त्यांना पटवीत होती. यांत ती तासभर तरी गुंतली असेल. मी एकटा होतों पण मला स्वास्थ्य मिळालें नाहीं. गुंगी येण्यापूर्वी डोक्यांत जें थैमान चाललें होतें तें आतां कमी झालें नसून त्यांत नवनवी भरच पडत होती. काय करावें हें सुचेना. जरा विरंगुळा वाटावा म्हणून टेबलावर पडलेलें ताजें वर्तमानपत्र सहज उघडलें. तों ठळक शीर्षकाखालीं एका विदुषीच्या विस्तृत व्याख्यानानें पत्राची बरीच जागा व्यापलेली

दिसली. आणि कांहीं कांहीं वाक्यें तर तांबड्या पेन्सिलीनें अधोरेखित केलेलीं होतीं. हें पत्र मुद्दामच कोणी पाठविलेलें असावें हें उघडच होतें. मी तें जरा वाचलें. त्यांत महत्त्वाचा मजकूर याप्रमाणें होताः—

" समाजपुरुष निर्ढावलेला आहे. त्याची कातडी टणक झालेली आहे. त्याचें हृदय दगडासारखें कठीण झालेलें आहे. आपल्या आया, बहिणी, लेकी–सुना यांचीं दुःखें पाहून त्याच्या संगदिल पथ्थरी हृदयावर कांहींच परिणाम होत नाहीं. परंतु कासवाची पाठ कितीही दगडासारखी टणक झाली तरी तिथेंही एक माऱ्याची जागा असते. ती म्हणजे कासवाची मान! तशी आपल्या आया–बहिणींचीं दुःखं प्रत्यहीं पाहून तिकडे आपली वज्रासारखी पाठ फिरविणाऱ्या समाज-पुरुषाची माऱ्याची जागा म्हणजे त्याची पत्नी. म्हणून एखाद्या दिव्यशक्तीच्या साह्यानें असें घडावें कीं, प्राचीन काळीं ज्याप्रमाणें शूरपुरुष इंद्राच्या दरबारीं निमंत्रिले जात, तसे आतां कांहीं काळाकरितां निमंत्रिले जावेत आणि मृत्युलोकीं असलेल्या आपल्या प्रिय पत्नी–पुत्रांच्या आपल्या पश्चात् कशा हाल अपेष्टा होतात, त्या चित्रपटाप्रमाणें त्यांना दिसाव्यात. या मात्रेचा परिणाम होऊन इंद्रसभेहून परत आलेले पुरुष स्त्रियांच्या बाबतींत आचरणांत व अस्तित्वांत असलेलीं सर्व जुलमी बंधनें तडातड तोडून टाकतील हें निःसंशय. परंतु ही कल्पना म्हणजे कल्पनाच—"

यापुढें मी निकाल दिलेल्या कालच्या 'केस' चा उल्लेख करून, जुलमी व हल्लींच्या काळाला अयोग्य अशा शास्त्रवचनावर आधारलेल्या रूढीची जीर्ण काठी हातीं घेऊन ठेंचाळत चाललेल्या आंधळ्या न्यायदेवतेची कींव करून, तिच्यावर संतापानें बरेच कोरडे ओढलेले होते. सर्व सत्य माहीत असल्यामुळें मी वर्तमान-पत्र दूर सारलें. परंतु नुकतीच पाहिलेली अज्ञात प्रदेशांतील सारी घटना व कालची केस दूर सरेनात डोळ्यांपुढून. गरीब बिचारी कालची ती पोरं! निकाल देतांना जेव्हां मी म्हटलें—

" ज्याअर्थी तूं जवळची वारस आहेस हें सिद्ध करूं शकली नाहींस व ज्याअर्थी फिर्यादी हे मयताचे भाऊबंद असून दहा दिवसांच्या सुतकाचे अधिकारी आहेत, असें पुराव्यानिशीं सिद्ध झालें आहे; त्याअर्थी तेच जवळचे आप्त ठरून मयताच्या मिळकतीचे वारस ठरतात—"

तेव्हां बिचारी हंबरडा फोडून म्हणाली—

" सरकार, मी तर मयताची बहीण. एका बापाचीं आम्हीं लेंकरें!"

कायद्याच्या बळकट पुराव्याच्या आधारावर मी उत्तरलों-" म्हणून काय झालें? लग्न होऊन तूं सासरीं गेलीस व परकी झाल्यामुळें आतां सोळावी वारस ठरली आहेस."

जीवावर बेतल्यावर हरिणीसुद्धां उलटते. बिचारी बाई न्यायालयाची गंभीरता विसरून उसळून म्हणाली—

" आग लागो या असल्या न्यायाला. भावाची बहीण, बापाची लेक सोळावी वारस ठरते अन् हे जन्मांत कधीं तोंड न पाहिलेले दूर देशांत राहणारे लोक, " दहा दिवस सुतक पाळतों " असें सिद्ध करून देऊन जवळचे वारस ठरतात! अहो, कोणाची एवढी संपत्ति फुकट लाटायला मिळत असेल, तर दहा दिवसच काय? वर्षभरसुद्धां कोणी सुतक पाळायला खुशीनें तयार होईल. तिथं काय आंतड्याला पीळ पडायचा आहे?"

मला जरी मनांतून बिचारीविषयीं वाईट वाटत होतें, तरी न्यायालयाची गंभीरता ढळूं देणें इष्ट नव्हतें. निर्विकारपणें, कायद्याचे आधार देऊन, मी माझें कर्तव्य पार पाडलें. ती रडत होती. आणि माझ्या चांगुलपणाबद्दल व निस्पृहतेबद्दल लोक तिची खातरजमा करीत होते. पण बिचारीचें समाधान कसें व्हावें?

मी बाहेर पडलों तेव्हां ती ओरडली—

"सरकार हा काय न्याय? बापाची लेक, भावाची बहीण खोटी ठरवलीत अन् परके लोक जवळचे ठरवलेत. हा कोण्या मुलखाचा न्याय?"

माझी नजर सहजच न्यायदेवतेच्या पुतळ्याकडे गेली. पुतळ्याचे डोळे बांधलेले होते. पण हातांतील न्यायतराजूखालची आधारपट्टी सरकल्यामुळें दोन्हीं पारडीं हेलकावे खात होतीं. माझें मनही हेलकावे खात होतें. तशा स्थितींतच मी घरीं आलों.

× × × ×

रात्र कशी गेली ती माझी मलाच ठाऊक. दुसऱ्या दिवशीं सुटी असल्यामुळें कोर्टांत जायचें नव्हतें. परंतु कालचें विचारचक्र थांबलें नसल्यामुळें मन वरीलप्रमाणें अज्ञात प्रदेशाची सफर करून आलें व तींतील विचित्र प्रसंगानें अगदीं भारावून गेलें.

मनावरील तें विचाराचें दडपण काढून टाकण्याकरितां माझा आनंदी व विनोदी मित्र चिंतामणि याच्याकडे मी गेलों. तो एका संस्थेचा प्रमुख होता. प्रयोग, योजना, व्यवस्था इत्यादि कामांची त्यांच्यावर बरीच मोठी जबाबदारी असे. तथापि त्रस्त मनःस्थितींत एकमेकांच्या गोड सहवासांत वेळ घालवून बोलून, चर्चा करून, एक-

मेकांच्या मनावरील ताण कमी वा दूर करून घेण्याची उभयपक्षीं आम्हांला संवयच जडली होती. व्यवसायभिन्नतेमुळें हेवादाव्याचें कांहीं कारणच नव्हतें. उलट एकमेकांची त्रस्तता दूर करण्याचें तें एक साधन मात्र होतें. मी आज त्याचा फायदा घेण्याचें ठरविलें. मी बंगल्यांत गेलों, तों तो प्रयोगालयांत गेल्याचें कळलें. बरें झालें, आयतीच चांगली कांहीं माहिती व करमणूक होईल. अशा मोठ्या उल्हासानें मी प्रयोगशाळेंत पाय ठेवला, तोंच—

" अहो, अद्यापपर्यंत ते जगले कसे याचंच मला नवल वाटतं."

हे उद्गार कानीं पडले. सभा दिसते. आज सुट्टीचा दिवस असूनही बिचाऱ्याला काम करावें लागतें.

" खरं आहे तुमचं म्हणणं. स्वैराचारी प्राणी ते. एवढ्या टीचभर कांचेच्या खोक्यांत वर्षानुवर्षे कोंडून ठेवल्यामुळें त्यांच्या मणक्यान् मणक्याचं पीठ झालं असेल."

कसला तरी मजेशीर वादविवाद होता तो. मी आंत जाण्यास अधीर असतांच माझ्या मित्राची दृष्टि मजवर पडली व मला आंत बोलावण्यांत आलें. उत्सुकतेनें आंत जात असतां मी म्हटलें- " चालू द्या, चालू द्या तुमची मीटिंग ! मी बाहेर थांबतों."

" छे, छे. संपलंच सारं." असें म्हणून सर्व उठले व जाऊं लागले.

" काय आज कसली मीटिंग होती ?" मी विचारलें.

" अरे, फार मोठी मजेशीर, अगदीं नवीन कामाबद्दल होती. तूं अर्ध्या तासापूर्वी यायला पाहिजे होतास."

" कां ?"

" अरे, आमच्या संग्रहालयांतल्या सापांनीं सत्याग्रह केला आहे !"

" काय, सापांनीं ?"

" हो."

" तो कां ? अन् कसा ?"

" कां म्हणजे ? तेसुद्धां सजीव प्राणी आहेत. त्यांनाही भावना, सुखसंवेदना आहेत. राग, लोभ सगळं—"

" माहित आहेरे ! पण तुम्हांला त्यांनीं कशा सांगितल्या आपल्या भावना ?"

" कशा म्हणजे ? अगदीं सनदशीर रीतीनं ! अन्न घ्यायचं नाकारलं व विष द्यायचं बंद केलं "—तो खो खो हंसला.

" बरं झालं सगळे साप निर्विष होतील तर. "

" अरे, काय बडबडतोस ? सर्पांचं विष बंद झालं तर मोठे मोठे प्रयोग कसे पूर्ण होतील ? तें क्षयरोगावरचं महत्त्वाचं औषध ! तें सापाचं विष उतरण्याचं औषध ! आणि तें कॅन्सरवरचें. असे मानवजातीच्या हिताचे कितीतरी प्रयोग अपुरे राहतील. त्यांच्यावर केलेला अवाढव्य खर्च फुकट जाईल. "

" अस्सं ! पण कायरे, त्यांना अन्नसत्याग्रह करायची युक्ति कशी सुचली रे ? "

" हं. त्यांच्या या चातुर्याचं आम्हांला सुद्धां नवलच वाटतं. त्यांनीं बहुधा असा विचार केला असेल कीं, आपणांस पाहिल्याबरोबर डोक्यावर सोटा हाणणारीं हीं माणसं, ज्या अर्थी आपणांस नेमानं दूधअंडीं पाजतात व बेडूक, उंदीर खायला देतात आणि आपलं विष ओकवून घेतात, त्याअर्थी आपणांपासून त्यांचा कांहींतरी फायदाच असेल. तेव्हां या दोन्ही गोष्टी बंद केल्या कीं माणसाचं लक्ष आपल्या गाऱ्हाण्यांकडे गेल्याशिवाय रहाणार नाहीं. तो बघ, त्या पेटींतला नाग; दररोज त्याला दोन बेडूक गट्ट करायला लागत असत. पण हल्लीं कित्येक दिवसांत तो बेडकाला शिवला नाहीं कीं उंदराकडे त्यानें पाह्यलं देखील नाहीं ! "

" मग कळलं कां त्याचं गाऱ्हाणं काय तें ? "

" हो. ह्या दीड दोन फूट चौरस कांचेच्या पेट्या त्यांना राह्यला किती अपुऱ्या आहेत ? वर्षांनुवर्षें शरीराची गुंडाळी करून त्यांत राह्यचं ! ना शरीर पसरायला जागा. ना फणा उचलायला. ना ऊन, ना हवा. सजीव प्राण्याच्या दृष्टीनें ही स्थिति किती शोचनीय आहे, नाहीं ? "

" खरंच ! "

" म्हणून आज मीटिंग बोलावली होती. "

" मग काय ठरलं ? "

" त्यांच्याकरितां एक हवाशीर घर—जागा—बांधायचं ठरलं. सभोंवार उंच उंच भिंती बांधून आंत त्यांच्यासाठीं कृत्रिम बिळं नी फटी बांधायच्या, म्हणजे त्यांना मनसोक्त वागतां येईल. एकमेकांसह बागडतां येईल. ऊन, हवा, प्रकाश आणि स्वातंत्र्य यांचा लाभ घेतां येईल. थोडक्यांत म्हणजे नैसर्गिक रीतीनें त्यांना राहतां येईल. "

" आणि भिंतीवरून पलीकडे जाऊन जातिस्वभावाप्रमाणें लोकांना चावतांही येईल ? " मी शंका काढली. त्यावर तो म्हणाला—

" नाहीं. नाहीं. त्यांना तसं करतां येऊं नये, याकरितां भिंतीसभोंवतीं आंतल्या बाजूनें खोल खंदक खणून तो नेहमीं पाण्यानें तुडुंब भरून ठेवण्यांत येईल. "

" अस्सं, पण कायरे हे साप तर निरनिराळ्या पेट्यांत बंद केलेले आहेत. अन् कांचेंतून आवाज बाहेर जात नाहीं, हा तर आपला अनुभव आहे. मग या सर्वांनीं सत्याग्रह करण्याचा विचार एकमेकांना कसा कळवला आणि अमलांत कसा आणला ? "

" देव जाणे ! फूत्कार टाकून कळवला कीं जिव्हाभिनयानें कळवला कीं दुसरा एखादा अज्ञात उपाय अमलांत आणला तें. पण एकदम सत्याग्रह सुरू झाला एवढं मात्र खरं ! "

" आणि अशा रीतीनें जात्या भयंकर असलेल्या या मुक्या प्राण्यांनीं आपली दाद लावून घेतली म्हणायची ? "

" हो. एकीच्या बळानें काय होणार नाहीं ? त्यांची उपेक्षा केली तर एवढे उपयोगी जीव मरतील नी मोठमोठे प्रयोग अपुरे राहतील ना ? "

" खरं आहे. " स्वगत उद्गारल्यासारखा, कांहींतरी बोलायचें म्हणून मी बोललों. पण खरें म्हणजे अत्यंत खळबळीमुळें माझें डोकें ठिकाणावर नव्हतें. माझ्या डोक्यांत कालच्या व आजच्या प्रकरणांमुळें विचारांचा मोठा गोंधळ चालू होता. दोन चित्रें डोळ्यांपुढें उभीं राहून मनाला जोराचा धक्का बसल्यासारखें झालें होतें. त्या धक्क्या-सरसें विचारचक्र जोरजोरानें फिरत होतें.

" सत्याग्रह— ' ' विष देण्याचें बंद केलें— ' ' एकीचें बळ काय नाहीं करणार ? "

खरेंच, निरनिराळ्या पेट्यांत बंद करून ठेवलेल्या भयंकर विषारी कीटकांना अज्ञात मार्गानें संघटना करून, एकीच्या बळावर आपलें दुःख वेशीवर टांगून दाद लावून घेतां येते, आणि स्त्री—स्त्रीजात—जी मानवतेची माता, त्यागाची मूर्ति आणि क्षमेची धरित्री, तिला आपली संघटना करतां येऊं नये आणि आपल्यावरील अन्यायाची दाद लौकर लावून घेतां येऊं नये हें केवढें आश्चर्य !

भ्रमल्या डोक्यानें गेलों तसाच मीं घरीं परत आलों.

---